# नवभारत

डिसेंबर २०१०



घराणेशाही खोलवर रुजली. इंदिरा गांधींनी संजय गांधी यांच्या अपघाती मृत्युनंतर राजीव गांधींना पक्षामध्ये आणले व नंतर ते देशाचे पंतप्रधान झाले. २) पक्षातील सर्व लोकशाही यंत्रणा इंदिरा गांधी यांच्या व्यक्तिस्तोमामुळे दूषित झाल्या. विविध विधानसभा निवडणूक झाल्यानंतर निवडून आलेल्या आमदारांनी स्वत: आपल्या नेत्याची निवड ...

१९८५ साली काँग्रेसला १०० वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त काँग्रेसचे अधिवेशन मुंबईत घेण्यात आले. या अधिवेशनात भाषण करतांना अध्यक्ष राजीव गांधी यांनी दलाली, भ्रष्टाचार यामुळे काँग्रेसजनांचा नैतिक अध:पात होत असल्याबद्दल चिंता व्यक्त केली होती. आज काँग्रेसला सव्वाशे वर्षे पूर्ण झाली. १९८५--२०१० या काळात काँग्रेसला ऱ्हासकाळ पाहावा लागला. २००४ नंतर काँग्रेसचे काही प्रमाणात पुनरुत्थान झाले आहे. आता पुढील ...

## काँग्रेसचा ऱ्हास व पुनरुत्थान

## भारताच्या परराष्ट्र धोरणात नेहरु व गांधी घराण्याचे योगदान

## इंदिरा गांधींचे वर्चस्व व संस्थात्मक ऱ्हास

# काल, आज आणि उद्या -३०

# सत्तांतर आणि काँग्रेस



अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४०० ००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६४। अंक ३। डिसेंबर २०१०
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९३१
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. २७/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## डिसेंबर २०१०

## अनुक्रमणिका



## श्रद्धांजली

प्रा. देवदत्त दाभोलकर प्राज्ञपाठशाळा मंडळाचे एक मोठे आधारस्तंभ आणि मार्गदर्शक होते. त्यांचे साताऱ्याला असणे हेच मंडळाच्या कार्यकर्त्यांना मोठे आश्वासक वाटत असे. मध्यंतरी मंडळाचे 'नवभारत' सातत्याने प्रसिद्ध होण्यात खूप अडचणी आल्या आणि काही महिन्याचे अंक प्रसिद्ध होऊ शकले नाहीत. त्यावेळी प्रा. दाभोलकरांनी नवभारतच्या संपादनाची सूत्रे हातात घेऊन 'नवभारत' ची गाडी रुळावर आणली. प्राज्ञपाठशाळा मंडळाने आयोजित केलेल्या चर्चासत्रांमध्ये आणि शिबिरांमध्ये त्यांचा महत्त्वाचा सहभाग आणि मार्गदर्शन होते. ते अव्याहत कार्यरत होते. शिबिरामध्ये किंवा व्याख्यानाला कमीत कमी उपस्थिती असली तरी आपले म्हणणे ते तितक्याच समर्थपणे आणि ठामपणे मांडत असत. तरुण कार्यकर्त्यांचे विचार समजून घेऊन त्यांना योग्य दिशा दाखविण्याचा त्यांचा प्रयत्न सतत सुरू होता.

प्रा. दाभोलकरांच्या निधनामुळे केवळ प्राज्ञपाठशाळा मंडळच नव्हे तर महाराष्ट्राचे वैचारिक जगत एका खंद्या विचारवंताला आणि मार्गदर्शनाला मुकले आहे.

ईश्वर मृतात्म्यास शांती देवो!!!

अनुक्रमणिका








# काँग्रेसचा ऱ्हास व पुनरुत्थान

प्रा. डॉ. अशोक चौसाळकर

१९८५ साली काँगेसला १०० वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त काँगेसचे अधिवेशन मुंबईत घेण्यात आले. या अधिवेशनात भाषण करतांना अध्यक्ष राजीव गांधी यांनी दलाली, भ्रष्टाचार यामुळे काँग्रेसजनांचा नैतिक अधःपात होत असल्याबद्दल चिंता व्यक्त केली होती. आज काँग्रेसला सव्वाशे वर्षे पूर्ण झाली. १९८५-२०१० या काळात काँग्रेसला ऱ्हासकाळ पाहावा लागला. २००४ नंतर काँग्रेसचे काही प्रमाणात पुनरुत्थान झाले आहे. आता पुढील काळात काँग्रेसपक्ष देशापुढे विकासाची कोणती कार्यक्रम पत्रिका ठेवतो हे पाहाणे महत्त्वाचे ठरणार आहे.

इ. स. १९८५ ते २०१० या काळात काँग्रेसचे राजकारण तीन वेगवेगळ्या टप्प्यांतून गेले. यापूर्वी देशाच्या राजकारणावर असलेले प्रभुत्व संपावयास सुरुवात झाली. तीन टप्पे खालील प्रमाणे—

१) पंतप्रधान राजीव गांधी यांच्या नेतृत्वाखालील काँग्रेस (१९८५-१९९१) या काळात १९८४ साली काँग्रेसचा मोठा विजय झाला व १९८९ साली पक्षाचा पराभव झाला. ऱ्हासाची ही सुरुवात होती.

२) इ. स. १९९१-९८ या काळात पाच वर्षे काँग्रेसपक्ष सत्तेवर होता व त्या पक्षाने उदारीकरणाचे धोरण सुरू करून देशाच्या अर्थकारणात बदल घडवून आणला. या काळात घराणेशाहीचे नेतृत्व नसतांनाही काँग्रेसने लोकांना आपला प्रभाव कायम ठेवला.

३) इ. स. १९९८-२०१० या काळात सोनिया गांधी पक्षाच्या नेत्या झाल्या. त्यातील चार वर्षे त्या विरोधी पक्षात होत्या पण भाजपविरोधी पक्षांची आघाडी बांधून त्यांनी २००४ साली भाजपाचा पराभव केला व २००९ साली पुनः विजय मिळविला. काँग्रेसचे पुनरुत्थान सुरू झाले.

१९८० व १९८४ च्या संसदीय निवडणुकीत जरी काँग्रेसचा विजय झालेला असला तरी संघटनात्मक दृष्ट्या पक्ष कमजोर झाला होता. १९७७ च्या निवडणुकीत काँग्रेसचा पराभव झाल्यानंतर पक्षाचा सामाजिक पाया कमजोर व्हावयास सुरुवात झाली. या प्रक्रियेची सुरुवात तशी उत्तरप्रदेश व बिहार या दोन प्रांतात झाली होती. त्यानंतर १९७८ साली पक्षामध्ये दुसरी फूट पडली पण १९८० च्या निवडणुकीनंतर जवळजवळ सर्व जुना पक्ष इंदिरा गांधी यांच्या पाठीमागे उभा राहिला. या काळात काँग्रेस पक्षात त्याने नव्या प्रवृत्ती निर्माण झाल्या. १) काँग्रेसपक्षात घराणेशाही खोलवर रुजली. इंदिरा गांधींनी संजय गांधी यांच्या अपघाती मृत्युनंतर राजीव गांधींना पक्षामध्ये आणले व नंतर ते देशाचे पंतप्रधान झाले. २) पक्षातील सर्व लोकशाही यंत्रणा इंदिरा गांधी यांच्या व्यक्तिस्तोमामुळे दूषित झाल्या. विविध विधानसभा निवडणूक झाल्यानंतर निवडून आलेल्या आमदारांनी स्वतः आपल्या नेत्याची निवड करण्याऐवजी ते काम खुद्द इंदिरा गांधीनीच करावे असे ठराव संमत करावयास सुरुवात केली. ३) काँग्रेस पक्षाने १९८० व ८८ साली निवडणुका जिंकल्या पण त्या काळात पक्षाची स्वतःची अशी संघटना नव्हती. पक्षाने कार्यकर्त्यांच्या भर्तीची व त्यांच्या प्रशिक्षणाची कोणतीही सोय केली नव्हती. कार्यकर्त्यांच्या बळापेक्षा धंदेवाईक लोकांना पैसे देऊन काम करण्याचे प्रकार वाढले. १९८५ मध्ये या नकारात्मक गोष्टी नुकत्याच सुरू झाल्या होत्या. व त्या राजीव गांधींना आवडल्या नव्हत्या.

**नव्या आर्थिक धोरणांचा पुरस्कार-**

१९६९-७० या काळात इंदिरा गांधींनी डाव्या आर्थिक धोरणांचा पुरस्कार केला होता. पण त्या धोरणाने आपले प्रश्न सुटत नाहीत असे त्यांना वाटले. व्यंकटरमन्, प्रणव मुखर्जी, व्ही. पी. सिंग वगैरे त्यांचा नव्या सहकाऱ्यांनी आर्थिक उदारीकरणाचा पुरस्कार केला आणि कुठलाही गाजावाजा न करता अर्थव्यवस्था खुली करण्यास त्यांनी सुरुवात केली. १९८५ नंतर राजीव गांधी यांनी खुल्या






अनुक्रमणिका

अर्थव्यवस्थेचा पुरस्कार केला पण कल्याणकारी राज्याच्या कल्पनेस पाठिंबा देणाऱ्या काँगेसजनांच्या विरोधामुळे त्यांना माघार घ्यावी लागली.

भारतीय अर्थव्यवस्थेपुढचे त्या काळातील दोन महत्त्वाचे प्रश्न हे परकीय चलनाचा तुटवडा व अन्नधान्याची टंचाई हे होते. परकीय चलनाचा तुटवडा दूर करण्यासाठी सरकारला आंतरराष्ट्रीय नाणेनिधीकडून कर्ज घ्यावे लागले. हरितक्रांतीनंतरही अन्नधान्याच्या टंचाईचा प्रश्न सुटला नव्हता. देशात डाळींची आणि गोड्या तेलाची कमतरता निर्माण झाली. पेट्रोलियमसाठीचा खर्च वहान उद्योगाचा विकास सुरू झाल्यामुळे वाढला.

**प्रादेशिक पक्षांचा उदय -**

१९८० व १९८५ मध्ये सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेसने विजय मिळविले पण त्यानंतर झालेल्या राज्यविधानसभांच्या निवडणुकीत काँग्रेसचा पराभव झाला. १९८५ नंतर राजीव गांधी यांना आंध्र व कर्नाटक या दोन राज्यात पराभव पत्कारावा लागला. १९८७-८८ मध्ये केरळ व तामिळनाडूमध्ये माकपचे नयनार व करुणानिधी यांची सरकारे सत्तेवर आली. आसाम व पंजाबात व जम्मू काश्मीरात काँग्रेसचा पराभव झाला. या सर्व निवडणुकात कर्नाटकचा अपवाद वगळता प्रस्थापित राष्ट्रीय विरोधी पक्षाने काँग्रेसचा पराभव केला नाही. काँग्रेसचा पराभव अकालीदल, नॅशनल कॉन्फरन्स, आसामगण परिषद, द्रमुक, तेलगुदेशम् या प्रादेशिक पक्षांनी केला. या काळातच भारतात बलवान अशा प्रादेशिक पक्षांचा उदय झाला. केरळ, आंध्र, तामिळनाडू, कर्नाटक या प्रांतातील मध्यमवर्गांची नाराजी मोठ्या प्रमाणात काँग्रेसला भोवली. भारत सरकारच्या विरुद्ध दशहतवादी सशस्त्र चळवळी पंजाब व आसाम या प्रांतात सुरू झाल्या. पंजाबातील चळवळ अत्यंत हिंसक होती व त्यात हजारो माणसे ठार झाली. आसाममधील परकीय नागरीकांविरूद्धची चळवळ कमी हिंसक असली तरी त्यानंतर आसामातील विविध आदिवासी गटात संघर्ष सुरू झाले. आणि आज संपूर्ण उत्तरपूर्व भारतात बहुतेक राज्यात सशस्त्र बंडखोर चळवळी सुरू आहेत. या चळवळींना सुरुवात आसाम आंदोलनाच्या काळात झाली. काश्मीरात असंतोष होता. १९८७ नंतर तो तीव्र झाला व १९८० नंतर तेथे पण हिंसक चळवळ सुरू झाली.

१९८१-८४ या काळात इंदिरा गांधींना व १९८४-८९ या काळात राजीव गांधींना या नव्या आव्हानांना तोंड द्यावे लागले.

**मंडल आयोगाच्या शिफारसी :**

१९७८ साली मोरारजी देसाई सरकारने डॉ. बी. पी. मंडल यांच्या अध्यक्षतेखाली मागास जाती आयोग नेमला. भारतात ज्या शेकडो इतर मागास जाती आहेत त्यांना राखीव जागांचा व इतर कल्याणकारी योजनांचा लाभ मिळावा म्हणून हा आयोग नेमण्यात आला. यापूर्वी नेमलेल्या काका कालेलकर आयोगाने मागासपणा दूर करण्यासाठी अनेक उपाययोजना सुचविल्या होत्या पण सरकारने तो अहवालच बासनात बांधला!

भारतात सामाजिक न्याय व समता ह्यांच्या स्थापनेसाठी दक्षिण भारतात व नंतर उत्तर भारतात प्रयत्न झाले. द. भारतात मद्रास व मुंबई प्रांतात ब्राह्मणेतर चळवळीच्या प्रयत्नांनी इतर मागास जातींना काही जागा राखीव मिळाल्या. चळवळीमुळे सामाजिक प्रगती व शिक्षणाचा प्रचार व प्रसार झाला. कुळ कायद्यामुळे शेत जमिनीचे वाटप झाले. १९५६ साली भाषावार प्रांतरचना झाली व हळूहळू मागास जातींना राजकारणात स्थान मिळू लागले. १९७०-७१ नंतर या राज्यात शे. ६० टक्क्यांपेक्षा त्या जास्त जागा राखीव ठेवण्यात आल्या. काँग्रेसने बहुजन-समाजात आपला प्रभाव त्यामुळे कायम ठेवला. पण उत्तर भारतात विशेषतः बिहार व उत्तर प्रदेशात सत्ता ब्राह्मण, राजपूत, कायस्थ व भूमीहार यांच्या ताब्यात राहिली. त्यांची लोकसंख्या शे. १७.१८ टक्क्यांच्या आसपास होती. मागास जातींना सत्ता देण्याची या गटांची तयारी नव्हती. डॉ. मंडल यांनी १९८०-८१ मध्ये आपल्या शिफारसी केल्या. त्यावेळी अशी अपेक्षा होती की या शक्तीत राजकीय दृष्ट्या सजग असणाऱ्या इंदिरा गांधी या शिफारसी स्वीकारतील व उत्तर भारतातील मागास जातींचा पाठिंबा मिळवतील. कारण दक्षिण भारतात त्यांनी ही गोष्ट यशस्वी रित्या केली होती पण उत्तर भारतातील संवर्ण पुढाऱ्यांच्या विरोधामुळे काँग्रेसचे दरवाजे अहीर-जाट कुर्मी-कोयरी यांच्यासाठी बंद राहिली. जनतादलाने त्यांना पाठिंबा दिला. या नव्या जागृत गटाने








१९८९ साली या दोन राज्यांत काँग्रेसचा मोठा पराभव केला. चौधरी रेबीलाल, व्ही. पी. सिंग, मुलायमसिंग यांनी या संघटनेस सुरुवात केली होती. थोडक्यात जातीचा प्रश्न १९९० च्या दशकात मोठ्या प्रमाणात पुढे येणार होता व इंदिरा गांधी आणि राजीव गांधी यांना त्यांचे गांभीर्य कळाले नाही व ही चूक काँग्रेससाठी फार हानिकारक ठरली.

**हिंदुत्त्वाचे आक्रमक राजकारण :**

१९८४ पासून संघपरिवारांने बाबरी मशिदीचा प्रश्न राष्ट्रीय राजकारणाच्या अजेंड्यावर आणला होता. पण त्यांना त्यात फार पाठिंबा मिळाला नव्हता. रामाच्या नावाने आक्रमक हिंदुत्त्वाचे राजकारण विश्वहिंदू परिषदेने सुरू केले. १९४९ साली बाबरी मशिदीत राम लक्ष्मणाच्या मूर्ती बळजबरीने बाबरी मशिदीत ठेवण्यात आल्या. नेहरुंनी त्या तेथून हटवण्याचा आग्रह धरला असताना मुख्यमंत्री जी. बी. पंत यांनी त्या मूर्ती तेथून हलवल्या नाहीत. हे सर्व प्रकरण न्यायालयात गेले. १९८६ साली न्यायालयाने निर्णय दिला की पूजा करण्यासाठी रामलक्ष्मण ठेवलेल्या जागेचे कुलूप काढावयास हरकत नाही. हा निर्णय धोक्याचा होता. अलाहाबाद उच्च न्यायालयात जाऊन त्यावर स्टे घेण्याऐवजी सरकारने स्थानिक कोटीच्या निर्णयाप्रमाणे दरवाजा उघडला आणि त्या दिवसांपासून भाजप ज्या बाबरी मशीद विरोधी चळवळीत पाठिंबा मिळू लागला. अशा चळवळीविरुद्ध पक्की धर्मनिरपेक्ष भूमिका घेऊन लढणे आवश्यक होते. त्यासाठी काँग्रेस पक्षास तयार करणे गरजेचे होते पण मतपेटीच्या राजकारणामुळे सरकार आंदोलनास सवलती देत राहिले. सर्वोच्च न्यायालयाने पण ढिली भूमिका घेतली. भाजपला जनतेचा पाठिंबा मिळत होता.

त्यावेळी जनता दल व माकप यांचे काँग्रेस विरोधी राजकारण जोरात होते. जनता दलाने एका बाजूला भाजप व दुसऱ्या बाजूला डावी आघाडी यांच्याशी आघाडी केली व काँग्रेसला १९८९ साली पराभूत केले. व्ही. पी. सिंग यांनी सरकार स्थापन केले व ऑगस्ट १९९० मध्ये मंडल आयोगाच्या राखीव जागाबाबतच्या शिफारसी अंमलात आणल्या. उत्तर भारतातील सवर्णांनी त्यास अतिरेकी विरोध केला व त्याचा परिणाम म्हणून इतर मागास जाती जास्त चांगल्या प्रकारे संघटित झाल्या. भाजप व जनतादल यांच्यात संघर्ष झाला व सिंग यांचे सरकार कोसळले. भाजपात सोमनाथ ते अयोध्या यात्रा अडवानींच्या नेतृत्वाखाली काढली. त्यांनी मोठ्या प्रमाणात धार्मिक संघटन केले.

याकाळात जात व धर्म या आधारावर लोकांना संघटित करण्याचे राजकारण देशात सुरू झाले. धर्माच्या नावाने रामजन्मभूमी रथयात्रा काढण्यात आले. त्या काळात मोठ्या प्रमाणात जातीय दंगे झाले. अडवानी व भाजप यांची लोकप्रियता उत्तरप्रदेशात व इतर भागात वाढली. उत्तर प्रदेश व बिहारात या हिंदुत्त्वाच्या राजकारणाचा विरोध करून मागास जाती व मुस्लिम यांचे संघटन करणाऱ्या मुलायमसिंग यादव व लालूप्रसाद यादव यांचा प्रभाव वाढीस लागला. सवर्ण जातींनी आपल्या हितसंबंधांचे संरक्षण करण्यासाठी भाजपचा आश्रय घेतला. त्यांनी काँग्रेसचा त्याग केला. मागास जातींनी समाजवादी पक्ष-राष्ट्रीय जनतादल व बहुजनसमाज पक्ष या प्रादेशिक व जातिशः संघटन करणाऱ्या पक्षांना पाठिंबा द्यावयास सुरुवात केली. अतिमागास व दलित जातींनी बहुजन समाज पक्षास पाठिंबा द्यावयास सुरुवात केली. 'व्होट हमारा राज तुम्हारा नही चलेगा नही चलेगा' ही बसपची घोषणा लोकप्रिय झाली. त्यामुळे या दोन महत्त्वाच्या राज्यातील 'व्होट व राज' या दोन्ही गोष्टी काँग्रेसपासून दूर जावयास सुरुवात झाली. आपला सामाजिक पाया आपणापासून दूर जात आहे याची राजीव गांधी यांना जाणीव नव्हती.

व्ही. पी. सिंग यांचे सरकारपडल्यानंतर गांधींपुढे दोन पर्याय होते. १) काँग्रेसचे सरकार बनवण्याचा किंवा २) श्री. चंद्रशेखर यांच्या समाजवादी जनता दलाच्या सरकारला पाठिंबा देण्याचा त्यांनी सरकार बनवले नाही ही गोष्ट योग्य केली पण संपूर्ण देशाचा कारभार ६८ खासदारांच्या पक्षाच्या हातात देण्याऐवजी त्या सरकारमध्ये काँग्रेसपक्षाने सामील होणे गरजेचे होते. ते त्या सरकारने कमीत दीड ते दोन वर्षे आघाडी सरकार म्हणून काम केले असते म्हणजे जात व धर्म यांचा प्रभाव कमी झाला असता पण राजीव गांधी यांची स्वत:ची राजकारणाची जाण मर्यादित होती. पक्षात त्यांची एकाधिकार-










शाही होती आणि त्यांचा खोल असा संशयग्रस्त स्वभाव होता. त्यामुळे आंध्र व कर्नाटकात त्यांनी ३ वर्षांच्या काळात तीन मुख्यमंत्री बदलले. चंद्रशेखर यांचे सरकार पूर्ण परिस्थितीचा विचार न करता खाली खेचण्यात आले. देश निवडणुकीस तयार नसताना त्याच्यावर निवडणूक लादण्यात आली. तापलेल्या तव्यावर भाकरी भाजावयास व्ही. पी. सिंग व अडवानी तयार होते.

**पंतप्रधानपदी राव :**

१९९१ च्या संसदीय निवडणुकात भाजपने रामजन्मभूमीचा मुद्दा महत्त्वाचा केला. काँग्रेसने मुलायमसिंग यांचे सरकार खाली खेचून ह-प्र. विधानसभेसाठी पण निवडणूक घेतली होती! राजीव गांधी यांनी काँग्रेसचा प्रचार मोठ्या प्रमाणावर केला. पण दुर्दैवाने ते प्रचार करीत असतांनाच एल. टी. टी. ई. च्या आत्मघातकी गटाने त्यांची हत्या केली. २१ मे १९९१ रोजी ही शोकांतिका घडून आली. निवडणुकीत गांधींच्या हत्येमुळे काँग्रेसला जी सहानुभूती मिळाली त्याचा काँग्रेसला फायदा झाला व त्यास २३२ जागा मिळाल्या. राजीव गांधी यांची हत्या झाली नसती तर काँग्रेसला १८० पेक्षा जागा मिळाल्या नसत्या असे जाणकारांचे मत आहे. काँग्रेसला सत्ता मिळाली. त्यावेळी दुःखसंतस सोनिया गांधींनी काँग्रेस अध्यक्षपद स्वीकारण्यास नकार दिला आणि राजीव गांधी यांच्या जागी ज्येष्ठ काँग्रेस नेते नरसिंहराव यांची निवड करण्यात आली.

१९९१ च्या निवडणुकीत तीन महत्त्वाचे प्रवाह दिसून आले. त्यातील पहिला प्रवाह म्हणजे उत्तर प्रदेश व बिहार या आपल्या दोन बालेकिल्ल्यात काँग्रेस पक्षाचा सामाजिक पाया उध्वस्त झाला. काँग्रेसला मतदान शे. ३७ टक्के झाले. २) भारतीय जनता पक्षाचा एक मुख्य राष्ट्रीय पक्ष म्हणून उदय झाला. त्या पक्षास लोकसभेत ११९ जागा मिळाल्या आणि शे. २१ टक्के मते मिळाली. १९८९ च्या निवडणुकीत भाजपला शे. १०.५५ टक्के मते मिळाली होती. ३) प्रादेशिक पक्ष व जातीच्या आधारावर उभे राहिलेले पक्ष यांचा पाया जास्त पक्का झाला व जनतादल ह्या राष्ट्रीय पक्षाच्या विघटनास सुरुवात झाली.

१९९१-१९९८ ह्या काळात काँग्रेसच्या नेतृत्वपदी गांधी-नेहरु घराण्यातील व्यक्ती नव्हती. यातील पाच साडे पाच वर्षे सत्ता राव यांच्याकडे होती व उरलेले दीडवर्षे ती सीताराम केसरी यांच्याकडे होती. या काळात घराणेशाहीला मानणारा एक मोठा गट पक्षात होता आणि अप्रत्यक्षपणे घराणेशाहीचा प्रभाव पक्षावर होता. नरसिंहराव यांच्या काळात हा प्रभाव कमी झाला पण राव हे परिपक्व राजकारणी असल्यामुळे त्यांनी संघर्षाची भूमिका न घेता सोनियाजींच्या इच्छेस मान दिला. पण सत्ता राव यांच्याकडेच होती आणि त्यांनी पंतप्रधानपद व काँग्रेस अध्यक्षपद ही दोन्ही पद आपल्याकडे ठेवली.

राव यांचा अनुभव मोठा होता. ते कसलेले राजकारणी होते. त्याचबरोबर वेळ पडल्यास मोठी 'रिस्क़' घ्यायची त्यांची तयारी होती. १९९१ साली त्यांनी उदारीकरणाच्या धोरणास सुरुवात करून देशाच्या अर्थकारणास व राजकारणास नवी दिशा दिली. त्यांच्या काळात अवघड आर्थिक परिस्थितीत सुधारणा झाली. अर्थव्यवस्था शे. ५ च्या दराने वाढू लागली. परकीय चलनाची गंगाजळी वाढली आणि देशाने एका नव्या दिशेने पाऊल टाकले. या नव्या धोरणाचे श्रेय राव व त्यांचा पक्ष काँग्रेसला जाते. पण काँग्रेस पक्ष नव्या धोरणास पाठिंबा देत नव्हता कारण अजूनही वैचारिक दृष्ट्या बहुतेक पुढारी कल्याणकारी राज्याचेच पुरस्कर्ते होते. राव यांनी मंडल आयोगाच्या शिफारशींना सर्वसमावेशक रूप देत नवा आदेश जारी केला आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्वोच्च न्यायालयाने त्यास मान्यता दिली. त्यामुळे मंडल आयोगामुळे निर्माण झालेला संघर्ष संपला. मात्र ओ. बी. सी. राजकारण सुरू राहिले. त्याचा फायदा करून घेण्यात भाजपला काही प्रमाणात यश मिळाले.

**नरसिंहराव आणि हिंदुत्वाचे राजकारण :**

नरसिंहराव यांच्या काळातील सर्वात मोठी शोकांतिका म्हणजे हिंदुत्ववाद्यांच्या आक्रमक जमावांनी बाबरी मशिदीवर हल्ला करून ६ डिसेंबर १९९२ रोजी तिचा केलेला नाश होय. सर्वोच्च न्यायालय, केंद्र सरकार यांस आपण बाबरी मशिदीचे संरक्षण करू असे आश्वासन देणाऱ्या कल्याणसिंग सरकारने कार सेवकांना बाबरी मशीद पाडावयास मुभा दिली. बाबरी मशीद पाडण्याचे कारस्थान मोठ्या प्रमाणात शिजले होते. सर्वोच्च न्यायालयाने कार-

सेवकांना त्या जागेवर प्रतिकात्मक कारसेवा करण्यास परवानगी देणे, तो संपूर्ण परिसर केंद्र सरकारकडे हस्तांतरित करण्यास मान्यता न देणे केंद्र सरकारने कलम ३५६ चा वापर करून ४ किंवा ५ डिसेंबरला कल्याणसिंग यांचे सरकार बरखास्त न करणे व मनुष्यहानी होईल या भीतीने तेथे उपस्थित असलेल्या केंद्रीय पोलिस दलाचा वापर न करणे या गोष्टी बाबरी मशीद पडावयास कारणीभूत ठरल्या. धर्मनिरपेक्ष भारतासाठी ती लज्जास्पद गोष्ट होती आणि राव यांना त्याची किंमत द्यावी लागली. राव यांनी भाजपवर विश्वास ठेवल्यामुळे बाबरी मशीद पडली. त्याचा परिणाम म्हणून गुजरात, महाराष्ट व उ. प्र. येथे मोठ्या प्रमाणात जातीय दंगे झाले. त्यात हजारो लोक मारले गेले. त्यानंतर सूडाचे राजकारण सुरू झाले. भारतात प्रथमच दहशतवादी कारवाया सुरू झाल्या. राव यांची ही चूक देशाला भोवली.

**राव यांचा पराभव :**

राव यांच्या काळात काँग्रेस पक्षाच्या संघटनेकडे दुर्लक्ष झाले. ते जोपर्यंत पंतप्रधानपदावर होते तोपर्यंत त्यांची पक्षावर चांगलीच पकड होती. पण त्यांच्या काळात भ्रष्टाचाराची अनेक प्रकरणे उघडकीस आली. दूरसंचार खात्याचे मंत्री सुखराम यांनी घोटाळे केल्यामुळे राजीनामा द्यावा लागला. त्याच काळात हर्षद मेहता प्रकरण निर्माण झाले. १९९४ साली आंध्र व कर्नाटक या दोन्हीही प्रांतात काँग्रेसचा पराभव झाला. त्यापूर्वी गुजरात व महाराष्ट्र या दोन राज्यात काँग्रेस पक्षाचा भाजपने पराभव केला. १९९६ च्या संसदीय निवडणुकीत राव यांनी हवाला प्रकरणाचा वापर करून महत्त्वाकांक्षी काँग्रेस पुढाऱ्यांना तिकीट दिले नाही. अद्रमुकशी आघाडी केल्यामुळे तामिळनाडूत बंड झाले. या सर्व गोष्टींचा परिणाम म्हणजे काँग्रेसचा पराभव झाला. काँग्रेसला १४२ तर भाजपला १६१ जागा मिळाल्या काँग्रेस पक्षाच्या पाठिंब्याने देवेगौडा यांच्या नेतृत्वाखाली राष्ट्रीय आघाडीचे सरकार सत्तेवर आले. यात जनता दल व माकप यांची प्रधान भूमिका होती.

राव यांच्या विरुद्ध तीन कोर्ट केसेस दाखल करण्यात आल्या. सत्र न्यायालयाने विरुद्ध निर्णय दिल्यानंतर त्यांनी राजीनामा दिला. त्यांच्या जागी सीताराम केसरी यांना पक्षाध्यक्ष म्हणून नेमण्यात आले. काँग्रेस पक्षाच्या अध्यक्षपदासाठी प्रथमच अटीतटीची निवडणूक झाली. शरद पवार यांनी निवडणूक लढविली. पण काँग्रेसमधील घराणेशाही केसरी यांच्यामागे उभी राहिली व पवार यांचा मोठ्या फरकाने पराभव करून केसरी निवडून आले. केसरी यांच्या महत्त्वाकांक्षा वाढल्या व त्यांनी देवेगौडा यांचे सरकार खाली खेचले. लोकसभा बरखास्त झाली व नव्याने निवडणूक घेण्याचे ठरले. गुजरात यांचे सरकार सरकारमधील द्रुमकच्या सहभागाच्या मुद्द्यावर सोनिया गांधी यांनी खाली खेचले!

देवेगौडा व गुजरात यांची सरकारे पावणे दोन वर्षे सत्तेवर होती. ती एक ऐनवेळची व्यवस्था होती. ही सरकारे फार दिवस चालू देणे काँग्रेस पक्षासाठी धोक्याचे होते.

**काँग्रेसचा ऱ्हास :**

१९९६ च्या निवडणुकीत काँग्रेस पक्षास मिळणारी मते कमी झाली. १९८९ साली काँग्रेसला शे. ३९ टक्के मते मिळाली. १९९१ साली शे. ३७ टक्के मते मिळाली व १९९६ साली शे. ८९ टक्के मते मिळाली. सत्तेवर असतानासुद्धा काँग्रेसची शे. ८ टक्के मते कमी झाली. उत्तर प्रदेश व बिहारमध्ये पक्षाचा प्रभाव पूर्णतः संपुष्टात आला. तमिळनाडूत मोपनार यांनी तमिल ममिला काँग्रेस हा प्रादेशिक पक्ष स्थापन केला तर ममता बॅनर्जी यांनी १९९७ मध्ये पक्षाचा राजीनामा देऊन तृणमूल काँग्रेस नावाचा स्वतःचा पक्ष स्थापन केला. त्यामुळे प. बंगाल व तमिळनाडू या महत्त्वाच्या राज्यात काँग्रेस पक्षाची ताकद मोठ्या प्रमाणात कमी झाली. १९९१-९८ या सातवर्षाच्या काळात नेहरु, गांधी कुटुंबातील कोणताही नेता नेतृत्वस्थानी नसताना काँग्रेस पक्षास लोकांचा पाठिंबा मिळत होता. पक्ष निवडणुका जिंकत होता. घराणेशाही, नेतृत्वपदी नाही म्हणजे काँग्रेससाठी प्रलयकाळ आहे अशी परिस्थिती नव्हती. पण काँग्रेसपक्षात असुरक्षिततेची भावना होती. घराणेशाहीशिवाय आपली धडगत नाही असे त्यांना वाटत होते. १९९८ च्या संसदीय निवडणुकीत काँग्रेससाठी आपण प्रचार करणार आहोत अशी सोनिया गांधी यांनी घोषणा केली. मार्च १९९८ च्या निवडणुकांत सोनिया व राहुल यांच्या सभांना सर्व भारतभर प्रचंड

गर्दी झाली व इंदिरा गांधींच्या काळात जशी इंदिरा लहर निर्माण होत असे तशी सोनिया लहर निर्माण झाली आहे असे काँग्रेस जनांना वाटू लागले. सोनियांच्या सभांना गर्दी होती पण त्या गर्दीस मतांमध्ये परिवर्तित करणारी पक्षसंघटना नव्हती. त्यामुळे भाजपच्या विजय यास त्या रोखू शकल्या नाहीत. काँग्रेसला १४४ जागा व शे. २५ टक्के मते मिळाली. काँग्रेसची मते शे. ४ टक्क्यांनी कमी झाली. काँग्रेसची कामगिरी १९९६ पेक्षा जास्त चांगली नव्हती.

**नवे राजकीय बदल :**

पण घराणेशाहीच्या पाठीराख्यांनी सीताराम केसरी यांची त्यांच्या पदावरून उचलबांगडी केली. "आपण निवडून आलेले अध्यक्ष आहे, आपण राजीनामा देणार नाही" असे ते म्हणत होते पण त्यांना पदावरून काढून टाकून सोनिया गांधी यांची काँग्रेस अध्यक्षाच्या पदावर नेमणूक करण्यात आली. आता गांधी घराण्याची सत्ता आली आहे व आपणास पंतप्रधानपद मिळण्याची शक्यता नाही असा विचार करून काँग्रेस संसदीय पक्षाचे नेते शरद पवार यांनी पक्षाचा राजीनामा दिला आणि स्वतःचा राष्ट्रवादी काँग्रेस नावाचा पक्ष स्थापन केला. ममता बॅनर्जी व मोपनार यांच्यानंतर पवार हे तिसरे महत्त्वाचे प्रादेशिक नेते होते ज्यांनी काँग्रेस पक्षाचा त्याग केला व स्वतःचा असा प्रादेशिक राजकीय पक्ष स्थापन केला. आपण काँग्रेस पक्षात राहाण्यापेक्षा पक्षाच्या बाहेर जाऊन जास्त चांगला राजकीय लाभ मिळवू शकतो अशी जाणीव प्रादेशिक नेत्यांच्यामध्ये त्याचवेळी निर्माण होते ज्यावेळी त्या पक्षाचा राजकीय प्रभाव क्षीण होत असतो.

१९९१-९८ या काळात काँग्रेस पक्षाचा पाया सातत्याने संकुचित होत होता व अनेक राज्ये पक्षाच्या हातातून निसटत होती. उत्तर भारतात इतर मागास जाती आणि दलित जातींच्या मतदारांना जातीच्या आधारे संघटित करणारे पत्र प्रभावी ठरले. बाबरी मशीदी प्रकरणी काँग्रेसने संधिसाधू व जमातवाद्यांना सोईची भूमिका घेतल्यामुळे नाराज झालेला मुस्लीम समाज पण राजद या पक्षांच्या बाजूने उभा राहिला. उत्तर प्रदेशात मायावती यांनी दलित मतदारांना आपला मूळ आधारभूत जनाधार वालपूत त्या आधारे विविध राजकीय आघाड्या बांधावयास सुरुवात केली. इतके दिवस उत्तर भारताचे राजकारण आपल्या ताब्यात ठेवणाऱ्या सवर्णजातींना आता सत्तेच्या परिघावर जाणे अपरिहार्य ठरले. त्यामुळे त्यांनी काँग्रेसचा त्याग केला व भाजपला पाठिंबा द्यावयास सुरुवात केली. बिहारमध्ये त्यांनी इतर मागास जातींचे नेते नीतीश कुमार व शरद यादव यांचे पुढारपण मान्य केले.

या काळात काँग्रेस पक्षाने नव्या आर्थिक धोरणास सुरुवात केली व राव यांच्या काळात स्थिर प्रशासन दिले पण सर्वसाधारण काँग्रेस जन त्या सरकारवर नाराजच होता. या काळात पक्षसंघटना कमजोर होती व कार्यकर्त्यांचे वैचारिक प्रशिक्षण होत नव्हते. लोकांना प्रेरणा देईल, त्यांच्या मनात नवी उमेद निर्माण करील अशी कोणतीही विचारसरणी काँग्रेस पक्षाजवळ नव्हती. बाबरी मशीद प्रकरणामुळे त्यांची धर्मनिरपेक्षतेबाबत, बांधलकी अल्पसंख्याकांना पक्की वाटत नव्हती. राज्यांत काँग्रेसचे विरोधक असणाऱ्या प्रादेशिक पक्षांची आघाडी बनवण्यात भाजप नेते श्री. अडवानी यांना १९९८ साली यश आले. तेलगू देशाचे नेते चंद्राबाबू नायडू, रामकृष्ण हेगडे, जयललिता, नवीन पटनाईक यांच्यासारखे नेते त्यांनी एकत्र केले व बहुमत मिळवून वाजपेयी यांचे सरकार स्थापन केले.

**सोनियांची चूक :**

१९९८ साली काँग्रेसचा पराभव झाला. पण पक्षाच्या नेत्यांनी सोनिया गांधी यांच्या पाठीमागे उभा राहण्याचे ठरवले. कारण सामूहिक नेतृत्वापेक्षा एक चातुकानुवर्ती नेतृत्व त्यांना भावते. वाजपेयी यांचा सरकारचा मार्च १९९९ मध्ये लोकसभेत अविश्वासाच्या ठरावात पराभव झाला. त्यावेळी सरकारच्या विरोधात २७१ मते पडली. या घटनेनंतर सोनिया गांधी यांनी राजकीय अनुभव नसल्यामुळे एक मोठी चूक केली. त्यांनी मुलायमसिंग यादव जयललिता इत्यादी नेत्यांशी चर्चा न करता त्यांचा पाठिंबा गृहीत धरून त्याचा आपण सरकार बनवावयास तयार आहोत. आपणास २७१ सभासदांचा पाठिंबा आहे असा दावा राष्ट्रपतींकडे केला! माखनलाल फोतेदार हंसराज भरद्वाज सारख्यांनी त्यांना हा सल्ला दिला असावा. त्यावेळी यादव यांनी सांगितले की त्यांच्या पक्षाने काँग्रेसला सरकार बनवण्यासाठी पाठिंबा दिलेला नाही. त्यानंतर लोकसभा

बरखास्त झाली आणि शरद पवार यांनी बंड पुकारून वेगळा पक्ष स्थापन केला. पुरेसा अनुभव नसल्यामुळे गांधींना हा कटु प्रसंग सहन करावा लागला.

**काँग्रेसचा पराभव व सोनियांची सत्त्वपरीक्षा :**

भारतीय जनता पक्षाने आपल्या आघाडीतील सर्व घटकपक्षांना आपल्याबरोबर कायम ठेवले. त्यांना एकच मताने पडल्यामुळे व विरोधकांनी पर्यायी सरकार न बनविल्यामुळे जनतेची सहानुभूती मिळाली. त्यातच कारगिलचे युद्ध झाले. वाजपेयी यांच्या चलाख आंतर राष्ट्रीय राजकारणाचा लोकांच्या मनावर सकारात्मक परिणाम झाला. त्यामुळे १९९९ च्या लोकसभा निवडणुकीत राष्ट्रीय लोकशाही आघाडीचा विजय झाला व त्यांस पूर्ण बहुमत मिळाले. काँग्रेसचा पराभव झाला. काँग्रेसचे मतदान शे. २३ टक्क्यांपर्यंत खाली घसरले व लोकसभेत आतापर्यंत सर्वात कमी म्हणजे फक्त १११ जागा त्यास मिळाल्या. केंद्रात वाजपेयी यांनी सरकार बनवले. महाराष्ट्रात विधानसभा निवडणुका झाल्या. राष्ट्रवादी काँग्रेसच्या आक्रमणास तोंड देत काँग्रेस पक्षाने चांगल्या जागा मिळविल्या. राजकीय व्यवहारवाद मान्य करून दोन्ही काँग्रेस पक्षांनी एकत्र येऊन आघाडी सरकार स्थापन केले. हे सरकार आजही सत्तेवर आहे. त्यांनी दोन निवडणुका जिंकल्या आहेत. याचा अर्थ असा की पवारांच्या बंडामुळे काँग्रेसचे मर्यादित प्रमाणात नुकसान झाले कारण विरोधात जाऊनही पवार काँग्रेसच्या प्रभावाखालीच राहाणे भाग पडले.

सोनिया गांधी यांच्या दृष्टीने पुढची ५ वर्षे एक सत्त्वपरीक्षाच होती. गुजरातमध्ये २००८ मध्ये भयंकर जातीय दंगली झाल्या व तेथे जमातवादी भावना तीव्र बनल्या. आंध्रात काँग्रेसचा पराभव झाला. राजस्थान, मध्यप्रदेश, ओरिसा या राज्यात पण काँग्रेस पक्षास पराभव सहन करावा लागला.

या काळात सोनिया गांधींना सत्त्वपरीक्षेला तोंड द्यावे लागले. वाजपेयींच्या परिपक्व राजकारणात तोंड देत त्यांना काँग्रेसचे विघटन रोखावयाचे होते कारण ममता बॅनर्जी व शरद पवार यांनी पक्षाचा त्याग केल्यामुळे पक्ष कमजोर झाला होता. सोनिया गांधींनी डॉ. मनमोहनसिंग यांना राजकारणात गुंतवून ठेवले. सिंग हे राव यांच्या काळात वित्तमंत्री होते व त्यांनी नव्या आर्थिक धोरणाची सुरुवात केली होती. नव्या आर्थिक धोरणामुळे देशात खोलवर बदल होत होते. भारतीय अर्थव्यवस्था शे. ६-७ टक्के दराने वाढत होती. नव्या मध्यमवर्गातील संख्या समाजात वाढत होती. वाजपेयी सरकारने उदारीकरणाचे धोरण कायम ठेवले. वाजपेयींच्या अश्वमेधाचा श्यामकर्ण घोडा भारतभर फिरत असताना काँग्रेसजनांमध्ये आत्मविश्वास कायम ठेवण्याचे काम सोनिया गांधींनी केले.

भारतीय राजकारणातील नवे बदल लक्षात घेऊन सोनिया गांधींनी अशी घोषणा केली की आता काँग्रेस पक्ष आघाड्यांची सरकारे बनवावयास तयार आहे व भाजपचे सरकार खाली खेचण्यासाठी काँग्रेस विरोधी पक्षांची आघाडी तयार करणार आहे. काँग्रेसने एकपक्षीय सरकारचा आदर्श सोडून दिला.

**संयुक्त पुरोगामी आघाडीचा विजय :**

काँग्रेसने भाजपच्या विरुद्ध मित्र पक्षांची आघाडी बनवावयास सुरुवात केली. त्यात त्यांना द्रुमुक, राष्ट्रीय जनता दल, झारखंड मुक्ती मोर्चा, राष्ट्रवादी काँग्रेस इत्यादी पक्षांचा पाठिंबा मिळाला. मोपनार यांचा तमिल मनिला काँग्रेसपक्ष काँग्रेसमध्ये सामील झाला. डाव्या आघाडीने भाजपचा पराभव करण्यासाठी काँग्रेसला पाठिंबा दिला व संयुक्त पुरोगामी आघाडीची रचना केली. या काळात भाजपस असे वाटत होते की आता त्यांच्या पक्षाचा विजय नक्की आहे. पक्षाचे नेते प्रमोद महाजन यांनी अत्यंत आक्रमक अशी प्रचार मोहीम राबवली होती. पण उत्तरप्रदेश हा भाजपसाठी अवघड प्रदेश होता. या अत्यंत गाजलेल्या निवडणुकीत भाजपचा पराभव झाला व काँग्रेसच्या नेतृत्वाखालची संयुक्त प्रागतिक आघाडी-डावी आघाडीस बहुमत मिळाले. बहुमतासाठी त्यांना मायावती किंवा मुलायमसिंग यादव यांचा पाठिंबा घेण्याची गरज राहिली नाही.

सोनिया गांधींनी काँग्रेस संसदीय पक्षाचे नेतेपद व पंतप्रधानपद नाकारले व त्याजागी डॉ. मनमोहनसिंग यांची नेमणूक केली. इ. स. २००४ मध्ये डॉ. मनमोहनसिंग देशाचे पंतप्रधान झाले पण पक्षाचे अध्यक्षपद सोनिया गांधींकडे राहिले. पक्षाच्या कामकाजाचा भार डॉ. सिंग यांच्यावर नाही पण सरकारचे काम डॉ. सिंग यांच्या

शिरावर आहे. डॉ. सिंग व सोनियाजी यांच्यामध्ये पूर्णपणे सामंजस्य आहे, खोल असा परस्परविश्वास आहे, त्यामुळे गेली सहा वर्षे केंद्राचा कारभार बिनबोभाट चालू आहे. सिंग यांच्या कामास लोकांचा पाठिंबा मिळाला आणि २००९ साली त्यांच्या सरकारला जनतेने जास्त बहुमताने निवडून दिले. या निवडणुकीच्या वेळी त्यांना डाव्या पक्षांच्या विरोधाचा सामना करावा लागला. काँग्रेस पक्षास स्वतःच्या बळावर २०४ जागा मिळाल्या. गेल्या चार निवडणुकांत काँग्रेस पक्षास १४० च्या आसपासच जागा मिळत होत्या पण यावेळी मात्र त्यास २०४ जागा मिळाल्या. आता त्यास लालू प्रसाद व मुलायमसिंग यादव यांच्या पाठिंब्याची पण गरज राहिली नाही.

गेल्या २५ वर्षातील काँग्रेसच्या वाटचालीतील हा तिसरा टप्पा महत्त्वाचा आहे कारण या टप्प्यात सोनिया गांधी, सिंग यांनी २००४ साली काँग्रेसला सत्ता मिळवून दिली व २००९ साली जास्त जागा मिळवून डाव्या पक्षांचा पराभव करून त्यास पुनः सत्तेत आणले. मात्र काँग्रेसचा २००४ ते २००९ साली विजय झालेला असला तरी त्यास मिळालेल्या मतांत फारसा फरक नाही. २००४ साली पक्षास शे. २४.५० टक्के मते मिळाली होती. आता ती शे. २९ टक्क्यांच्या आसपास आहेत. काँग्रेसच्या मतांच्या वाढीत उत्तर प्रदेशात राहुल गांधी यांनी केलेला प्रचार महत्त्वाचा होता. सध्या तरी काँग्रेसची मते शे. २५.२६ टक्क्यांच्या आसपास स्थिरावली आहेत.

**डॉ. सिंग यांचे नेतृत्व :**

डॉ. सिंग यांच्या नेतृत्वामुळे हे सरकार सुरळीतपणे चालवणे काँग्रेसला शक्य झाले. डॉ. सिंग हे अत्यंत प्रामाणिक शुद्ध चारित्र्याचे व उन्नत नैतिक भूमिका असणारे नेते आहेत. सिंग व सोनिया यांच्या दुहेरी नेतृत्वाचा संयुक्त पुरोगामी आघाडीस फायदा झाला. सिंग यांनी अमेरिकेशी केलेला अणुकरार आपले सरकार पणास लावून मान्य करून घेतला कारण देशाच्या विकासासाठी त्यांना हा करार होणे गरजेचे वाटत होते. डॉ. सिंग यांच्या ६ वर्षांच्या कारकीर्दीत अर्थव्यवस्थेच्या विकासाचा दर शे. ८ टक्क्यांपेक्षा जास्त आहे व एक विकास शीघ्र गतीने विकसित होणारी अर्थव्यवस्था म्हणून भारतास मान्यता मिळत आहे. गेल्या काही वर्षात आंतरराष्ट्रीय राजकारणात देशाची प्रतिष्ठा वाढली आहे. सगळ्या जगभरच्या अर्थव्यवस्था मंदीमुळे अडचणीत आलेल्या असताना भारतीय अर्थव्यवस्था त्यापासून कमी प्रभावित झाली कारण सिंग यांनी आपली धोरणे काळजीपूर्वक आखली होती. कल्याणकारी योजनांचा विचार केला तर म. गांधी रोजगार योजना हे महत्त्वाचे पाऊल ठरले त्याचा ग्रामीण लोकांस फायदा होतो आहे. भारतातील शे. ८० टक्के जनतेस दरमहा ३५ किलो अन्न कमीत कमी किंमतीस देण्याची योजना पण महत्त्वाकांक्षी योजना असून या दोन्ही योजना चांगल्या प्रकारे अंमलात आणल्या जाव्यात यासाठी सरकार प्रयत्न करीत आहे. डॉ. सिंग यांनी आर्थिक व्यवहारात राज्याचा हस्तक्षेप कमी केला व बाजारव्यवस्थेत जास्त वाव दिला. बाराव्या वित्त आयोगाच्या शिफारसीमुळे आता राज्य सरकारांना विकासासाठी मोठ्या प्रमाणात आर्थिक साह्य दिले जात आहे. त्या आर्थिक मदतीचा चांगला वापर करणाऱ्या राज्य सरकारांना आता लोक पुनः निवडूनही देत आहेत.

**आर्थिक समस्या :**

गतिमान आर्थिक विकासाबरोबर कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी होणे गरजेचे आहे याची जाणीव सिंग यांना असली तरी नवे आर्थिक धोरण समाजात नवे संघर्ष निर्माण करीत आहे. नव्या आर्थिक धोरणामुळे समाजात विषमता वाढत असून प्रचंड पैसा असणारा श्रीमंतांचा वर्ग निर्माण झाला आहे. त्याचबरोबर शे. २८ टक्के भारतीय जनता गरिबी रेषेखाली आहे कारण त्यांचे दररोजचे उत्पन्न १ डॉलरपेक्षा कमी आहे. दुसरी गोष्ट म्हणजे मध्यमवर्गाच्या संख्येत वाढ होत असून त्यास जास्त चांगल्या सोई व सुविधा हव्या आहेत. त्यांचा ग्राहक बदल पाठिंबा आहे. तिसरी गोष्ट म्हणजे देशात जे नवे उद्योगप्रकल्प होत आहेत त्यासाठी त्यांना जमिनी हव्या आहेत पण या शेतजमिनी देण्यास शेतकऱ्यांचा विरोध आहे कारण या नव्या प्रकल्पांनी त्यांची जगण्याची साधने व राहाण्याची जागा उध्वस्त होत आहेत. देशभर अशा प्रकारचे संघर्ष सुरू आहेत. लोक त्यासाठी रस्त्यावर येताना आपणास दिसतात. आता प्रश्न विकास की पर्यावरणाचे व लोकांच्या जीविताधिकाराचे संरक्षण असे निर्माण होत आहेत. डॉ. मनमोहनसिंग



सरकारला या तीनही बाबतीत लोकांना रुचतील अशा उपाययोजना शोधाव्या लागणार आहेत.

**काँग्रेसचा पक्षापुढील संघटनात्मक प्रश्न :**

इ. स. २००४ ते २०१० या काळात काँग्रेसपक्षावर गांधी घराण्याचे वर्चस्व होते. आता सोनिया व नंतर राहुल गांधी यांच्या रूपाने ते कायम राहील. डॉ. सिंग २०११ पर्यंत पंतप्रधान राहातील व २०१४ चा निवडणूक राहुल गांधी यांच्या नेतृत्वाखाली लढवली जाईल. पक्षाचे संघटन उभा करावयास राहुल गांधींना ४ वर्षाचा अवधी आहे. ही गोष्ट किती अवघड आहे हे त्यांना नुकत्याच बिहारच्या निवडणुकांच्या निकालावरून कळाले असेल. गेली सहा वर्षे केंद्रात सत्तेवर असूनही काँग्रेस पक्षाची संघटना उभी राहिलेली नाही. पं. नेहरुंच्या काळात ज्या प्रकारे देशभर काम करणारी जिवंत अशी संघटना होती त्या प्रकारची संघटना पक्षाजवळ नाही. अनेक प्रांतात पक्षातील मोठ्या नेत्यांनी विशेषतः प. बंगालमध्ये ममता बॅनर्जी, महाराष्ट्रात शरद पवार, संगमा यांच्या पक्षत्यागाने पक्ष कमजोर झाला आहे. तमिळनाडूत पण मोपनार यांच्या बंडानंतर शे. २०-२२ टक्के मते मिळवणाऱ्या काँग्रेसपक्षास ओहोटी लागली. गुजरात, ओरिसा व मध्यप्रदेश या प्रांतात काँग्रेसची ताकद चांगली असली तरी तेथील पक्षसंघटनेतील कमजोरीमुळे पक्षाचा सातत्याने पराभव होतो आहे. उत्तरप्रदेशात लोकसभेच्या निवडणुकीत काँग्रेसला जागा चांगल्या मिळाल्या पण तेथे पक्षसंघटनेची अवस्था चांगली नाही. पक्षाच्या विचारसरणीवर विश्वास ठेवून निस्वार्थीपणे काम करणाऱ्या कार्यकर्त्यांची आता वाण असून स्वार्थासाठी जमा झालेल्या धंदेवाईक राजकारण्यांची संख्या वाढते आहे.

गेल्या काही वर्षात अशा लोकांचा संघटनेत प्रभाव वाढल्यामुळे राजीव गांधी यांनी सत्तेच्या दलालावर केलेली टीका आज जास्त प्रस्तुत वाटते आहे. आज डॉ. सिंग यांचे सरकार काँग्रेसजनांच्या भ्रष्टाचारामुळे अडचणीत आले आहे. १९७४ साली इंदिरा गांधी, १९८८-८९ साली राजीव गांधी व १९९५-९६ साली नरसिंहराव याच प्रकारे अडचणीत आले होते व प्रत्येक वेळी निवडणुकीत काँग्रेसचा पराभव झाला आहे. आजचा प्रश्न असा आहे की भ्रष्टाचार व आता फक्त राजकीय नेत्यांपुरताच मर्यादित राहिला नाही. आता भ्रष्टाचाराची गंगोत्री सरकारी अधिकारी आहेत. भारतीय नोकरशाही जगातील सर्वात भ्रष्ट नोकरशाही असून अगदी सात बाराच्या उताऱ्याची प्रत मिळविण्यासाठी नागरिकांना पैसा चारावा लागतो. नोकरशाहीवर राजकीय नेत्यांचे नियंत्रण हवे कारण ते त्यांचे बॉस पण आता दोघे मिळून जनतेला तुटत आहेत. नेत्यांचा व कायद्याचा नोकरशाहीवर धाक नाही. राज्यकर्त्यांचे नैतिक अधिष्ठान ढासळल्यामुळे नोकरशाही बेबंद होत असून दलालांचे व मध्यस्थांचे फावते आहे. नीरा राडिया हेप्स भारतीय अभिजन वर्ग आपले काम करून घेण्यासाठी प्रथम एकमेकांना व नंतर जनतेत कसा लुबाडत आहे हे दाखवून देतात. जनतेचे प्रतिनिधी जोपर्यंत आपली नैतिक श्रेष्ठाना प्रस्थापित करीत नाहीत तोपर्यंत नोकरशाहीवर नियंत्रण आणणे अवघड आहे.

भारतीय राजकारणात काँग्रेस भाजप व डावे व प्रादेशिक पक्ष अशा राजकीय तीन पक्षांच्या आघाड्या आहेत. आणि भाजपचा प्रयत्न पुढील निवडणुकीत काँग्रेसपक्षाशी सरळ स्पर्धा करण्याचा आहे. राज्याराज्यात प्रादेशिक अस्मिता गोंजारणारे पक्ष आहेत. जातीच्या पायावर उभा राहिलेले पक्ष आहेत त्याचप्रमाणे जयललिता, शरद पवार, ममता बॅनर्जी यांच्यासारख्या नेत्यांच्या व्यक्तिमत्त्वाभोवती उभे राहिलेले पक्ष आहेत. या पक्षांशी जुळवून घेतच काँग्रेसला काम करावे लागेल. त्या अर्थाने २००४-०९ या काळातील संयुक्त पुरोगामी आघाडीस जास्त व्यापक समाजघटकांचा व पक्षांचा पाठिंबा होता. २००९-१४ या काळातील आघाडीत डावे पक्ष, मुलायमसिंग, लालूप्रसाद यांचा पाठिंबा नाही. त्यामुळेच काँग्रेस पक्षाला पुढील काळात जास्त सावधपणे वाटचाल करावी लागेल. बिहार निवडणुकीतील विजयानंतर भाजपचा भर जास्तीत जास्त नवे साथीदार मिळविण्यावर असणार आहे.

**नवी कार्यक्रमपत्रिका :**

२००९-१४ या काळातील संयुक्त पुरोगामी आघाडी सरकारने आर्थिक सुधारणांना जास्त गती देऊन भारतीय अर्थव्यवस्थेस जागतिक अर्थव्यवस्थेशी जोडण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. अणुऊर्जेच्या संदर्भात करार केल्यानंतर व ओबामांच्या परवाच्या भेटीनंतर अमेरिकेच्या विकसित तंत्रज्ञानाचे दरवाजे जर भारतासाठी खुले झाले तर विविध

क्षेत्रांत मोठ्या प्रमाणात विकास अपेक्षित आहे व आर्थिक विकासाची गती आणखी वाढणार आहे. चीन व भारत हे जगातील सर्वात जास्त वेगाने वाढणाऱ्या अर्थव्यवस्था असून एकविसावे शतक हे आशिया खंडाचे शतक असणार आहे. त्यामुळे आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय अर्थकारणात होणारे क्रांतिकारक बदल व त्याचे समाजजीवनावर होणारे परिणाम लक्षात घेऊन काँग्रेस सरकारला आपली धोरणे ठरवावी लागतील. भारत खूप मोठा देश आहे व तेथे सामाजिक बदल हळूहळू होतील. त्यांना व्यवस्थितपणे हाताळण्याचे आव्हान काँग्रेसपक्षापुढे आहे.

आपल्या समाजापुढे असणाऱ्या या समस्यांची राहुल गांधींना जाणीव आहे. म्हणून त्यांचा भर सामाजिक न्याय व विकासाचे विविध समाजघटकात न्याय्यवाटप करण्यावर आहे. पण तरीही पुढील दशकासाठी नवी कार्यक्रमपत्रिका राहुल गांधी अजून तरी तयार करू शकलेले नाहीत. अशी कोणतीही कार्यक्रमपत्रिका भाजपजवळ नाही पण भाजपजवळ ती नसली तरी काँग्रेसला सामाजिक न्याय, समाजवाद, धर्मनिरपेक्ष, राष्ट्रवाद व लोकशाही यांच्या आधारावर नवा विचार मांडावा लागणार आहे. काँग्रेसचा सर्व भर केंद्रीकरणावर आहे. त्याऐवजी विकेंद्री-करणावर भर देणे गरजेचे आहे. राज्यांकडे विकासाचे नवे प्रकल्प दिले जात आहेत. त्यामुळे राज्यांकडे चांगल्या प्रकारची आर्थिक साधने आहेत. त्यांची अंमलबजावणी कार्यक्षमरित्या कशी करायची हा प्रश्न पण महत्त्वाचा आहे. भारत हा तरुणांचा देश आहे. या तरुणांना जात व धर्म यांच्या प्रभावातून मुक्त करून नव्या प्रागतिक विचारांनी प्रेरित करणे गरजेचे आहे. नव्या विचारांनी जर ते प्रेरित झाले तर काँग्रेसपक्षास नवे कार्यकर्ते मिळू लागतील. नव्याने त्यास पक्ष संघटना पण बांधता येईल.

१९८५-२०१० या काळात काँग्रेस पक्षाचा ऱ्हास झाला. भारतीय राजकारणावरचे पक्षाचे प्रभुत्व संपले. भारतीय जनता पक्ष नावाचा नवा स्पर्धक पक्ष तयार झाला. पक्षाचा सामाजिक पाया कमजोर झाल्यामुळे व पक्षसंघटनेकडे अक्षम्य दुर्लक्ष केल्यामुळे पक्षाचा ऱ्हास झाला. पण पक्षाचा प्रभाव जरी कमी झाला असला तरी पक्ष पूर्णतः नष्ट झालेला नाही. २००० नंतर पक्षाचा ऱ्हास काही प्रमाणात थांबला. नव्या परिस्थितीच्या संदर्भात काँग्रेसने धोरणे बदलली. आघाडीची सरकारे बनवण्याची तयारी दाखवली आणि महाराष्ट्र व जम्मू काश्मीरात ती चांगल्याप्रकारे चालवली. २०१४ साली आपल्या स्वतःच्या बळावर केंद्रात सत्ता काबीज करण्याची काँग्रेसची इच्छा असली तरी आघाडीची सरकारे चालवण्याची त्याची तयारी आहे.

इ. स. १९८५ ते २०१० या पंचवीस वर्षांच्या काळात आपण प्रथम काँग्रेसचा ऱ्हास व नंतर काँग्रेसचे पुनरुत्थान कसे झाले ते पाहिले. या काळात काँग्रेसने नव्या आर्थिक धोरणांचा पुरस्कार करून विकासाची नवी दिशा दाखवली व काही मूलगामी कल्याणकारी योजना सुरू केल्या या काळात मंदिर, मंडल व मार्केट या तीन घटकांनी भारतीय राजकारण प्रभावित केले होते. भारतीय जनता पक्ष हा काँग्रेसचा मुख्य विरोधी पक्ष असून व्यवहारवाद आणि अत्यंत धोकादायक हिंसक राजकारण ही त्या पक्षाची रणनीती आहे. काँग्रेसविरोधी पक्षांची आघाडी बनवण्याचे कौशल्य त्यांच्याकडे आहे. काँग्रेसला पुढील काही दशकांसाठी आपली कार्यक्रम पत्रिका पक्की करावी. त्यात भारतीय लोकशाही प्रक्रिया जास्त जनताभिमुख करणे. धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचा पक्का पुरस्कार करणे, सामाजिक न्यायाचे व समतांचे समान वितरण करण्याचे कार्यक्रम जारीने अंमलात आणणे, देशास आर्थिक विकासाच्या मार्गावर अग्रेसर ठेवणे, देशांतर्गत दहशतवादाचे आव्हान मोडून काढणे आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रात जास्त सकारात्मक भूमिका बजावणे इत्यादींचा समावेश करता येईल. गेली २५ वर्षे काँग्रेसची परीक्षा पाहाणारी ठरली पुढील २५ वर्षे पुनरुत्थानाची असतील अशी पक्ष कार्यकर्त्यांची अपेक्षा आहे.

**संदर्भ ग्रंथ :**

१. Jafre lot, chrictoth. India's silent revolution the rise of lower castes in North India Columbia University, 2003.

२. Paul Brass F. tty year of India's Courtitution O U P 2001.

३. Yogendra Yadhave and Suhas Palashikar "From hegemony to







अनुक्रमणिका

convergence : partg system and electoral politics in Indian states" p.p. 5-40 Jowrnal of Indian school of Political economy, vol. 15, Nos. I and II, Jan-June 2003.

४. Thomas Blom Handen The saffron weve Democracy and Hindu nationalism in modern India O U P 1999.

५. Francis Frankel and M. S. A Rao (edited) Dominance and state power in India-Decline of social order, Uda. I and II Oxford University Press, 1989-90.





अनुक्रमणिका

# भारताच्या परराष्ट्र धोरणात नेहरु व गांधी घराण्याचे योगदान

प्रा. विठ्ठल दहिफळे

आधुनिक भारताच्या जडणघडणीत भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचे महत्त्वपूर्ण योगदान राहिले आहे. चळवळीच्या स्वरुपात उदयास आलेल्या या पक्षाने म. गांधींच्या नेतृत्वाखाली देशाला ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या जोखडातून केवळ मुक्तच केले नाही तर जवाहरलाल नेहरुंच्या नेतृत्वाखाली संसदीय लोकशाहीप्रती कटीबद्ध असलेल्या आधुनिक राष्ट्र-राज्य व्यवस्थेचा पाया घातला. डिसेंबर २०१० मध्ये काँग्रेस पक्षाच्या स्थापनेला १२५ वर्षे पूर्ण होत आहेत. देशात व एकूणच आधुनिक जगाच्या इतिहासात प्रदीर्घकाळ सत्तेत राहिलेल्या फार मोजक्या राजकीय पक्षात या पक्षाची गणना होते. देशांतर्गत व परराष्ट्र धोरणाच्या पायाभरणीत पक्षाचे योगदान अत्यंत मौलिक राहिले आहे. स्वातंत्र्योत्तर काळात एक देश व राष्ट्र म्हणून जगाच्या व्यवस्थेत भारताने जे काही आज प्राप्त केले वा गमावले आहे त्याचे सर्वाधिक उत्तरदायित्व सदरील पक्षाकडेच जाते. दुसरा महत्त्वपूर्ण पैलू असा की नेहरु व गांधी घराण्याकडे काँग्रेस पक्षाची व पर्यायाने देशाची सर्वोच्च सत्ता प्रदीर्घकाळ राहिली आहे. नेहरु ते सोनिया गांधी व उभरते नेतृत्व राहुल गांधीपर्यंत देशाच्या अंतर्गत व परराष्ट्र धोरणाच्या जडणघडणीत नेहरु-गांधी घराण्याचे महत्त्वपूर्ण योगदान आहे. यामुळे सदरील लेखात नेहरु व गांधी घराण्याचे भारताच्या परराष्ट्र धोरणातील योगदानाचा चिकित्सक वेध घेण्याचा अल्पसा प्रयत्न करण्यात आला आहे.

भारताच्या पंतप्रधानपदी सर्वाधिक साडेसतरा वर्षे नेहरु राहिले व त्या पाठोपाठ तब्बल सोळा वर्षे श्रीमती इंदिरा गांधी विराजमान राहिल्या. नेहरुंनी परराष्ट्र खाते स्वतःकडेच ठेवल्यामुळे व त्यांची थेट गुंतवणूक सर्वाधिक राहिल्यामुळे भारताच्या परराष्ट्र धोरणाचे शिल्पकार, आधुनिक भारताचे निर्माते इत्यादी बिरुदावल्याही त्यांना चिकटल्या. आज त्यांच्या निधनाला साडेचार तर इंदिरा गांधींच्या निधनाला अडीच दशकांपेक्षाही अधिक कालावधी उलटून गेला आहे. भारतीय अर्थराज्य व्यवस्था जागतिकीकरण व उदारीकरणाच्या प्रक्रियांशी वेगाने एकरुप होत असताना गत काळातील परराष्ट्र धोरणाच्या कर्णधारांच्या भूमिकांचे मूल्यमापन करणे अत्यंत कठीण आहे. तत्कालीन परिस्थितीचे संदर्भ विचारात न घेता विचारधारांच्या झापडबंद मोजपट्ट्या लावून जेव्हा असे मूल्यमापन केले जाते तेव्हा ते एकांगी व अन्यायमूलक होत असते. यामुळे देशाच्या परराष्ट्र धोरणाच्या कर्णधारांच्या भूमिकांना वस्तुनिष्ठतेच्या तराजूत प्रचलित रूढीबद्ध प्रचारकी मार्गाने तोलने सरळ-सरळ अन्यायकारक असल्यामुळे सदरील लेखात भावूकतेच्या छटांना निग्रहाने बाजूला सारित तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात लेखा-जोखा मांडण्यात येत आहे.

देशाच्या राजकारणात पंतप्रधान येतात जातात पण त्यांची ध्येयधोरणे दूर-दूरच्या भवितव्याला प्रभावित करतात. त्यांची राज्य-परराष्ट्र व्यवहार नीति देशाच्या प्रगतीचा मार्ग प्रशस्त करतात किंवा वादाचा विषय बनतात. त्यांच्या अधिमान्यता, प्राधान्यक्रम निवडणुका जिंकणे, किंवा हरण्याचे निमित्त बनतात. नेहरु व गांधी घराण्यातील सदस्याबाबत ही देशाने काहीसा असाच अनुभव घेतला आहे. देशासाठी त्याग, समर्पण व बलिदान देणाऱ्या या घराण्यातील सदस्यांना जनतेने जसा भरभरून पाठिंबा, प्रतिसाद दिला तसे प्रसंगी झिडकारलेही. वलयांकित व भारदस्त राजकीय नेतृत्व देणारे नेहरु यातून सुटले नाहीत की कणखर बाण्याच्या इंदिरा गांधी, दमदारनीति बाबत परिचीत असणारे राजीव गांधी वगळले गेले नाहीत की त्या सर्वांचा वसा-वारशाचे भार वाहणाऱ्या सोनिया. नेहरुंच्या व्यक्तिमत्त्वाभोवती तर लांच्छन, आरोप, संशयाची पुटेच पुटे चढविली गेली. अगदी त्यांच्या परराष्ट्र भूमिकाच विचारात घेतल्या तर; काश्मिर समस्या व चिनी आक्रमण हे त्यांच्या फसलेल्या आदर्शवादी जागतिक शांततेच्या धोरणाचा परिणाम मानला गेला. सुरक्षा परिषदेत

अनुक्रमणिका

चीनच्या स्थायी सदस्यत्वाच्या दाव्यास दर्शविण्यात आलेला जाहीर पाठिंबा हा मुत्सद्दीपणाचा अभाव होता, काळाबरोबर न जाता वेगळी वहीवाट पाडून स्वीकारलेला अलिप्ततावाद हा शुद्ध मूर्खपणा होता, बलवत्तर केंद्रीय प्रवृत्ती असणाऱ्या संघराज्याचा घातलेला पाया भारताच्या विभाजनास जबाबदार मानण्यात आला. त्यांच्या अल्पसंख्यांकाप्रती असलेल्या गांधीवादी काळवळयात मुस्लिमांप्रतीच्या तुष्टिकरणाची बिजे होती, लेडी माऊंटबॅटनशी असलेला मोकळचाकळेपणा ही अनैतिकता होती, देशाच्या लष्करी सज्जतेकडे झालेले दुर्लक्ष हा अक्षम्य अपराध होता या व यांसारख्या अनेकानेक आरोपांनी नेहरुंचे व्यक्तिमत्त्व झाकोळून गेले आहे. इंदिरा गांधीना यापेक्षा वेगळी वागणूक दिली गेली नाही. त्यांना एकीकडे 'दुर्गा' म्हणून जसे गौरविण्यात आले तसेच हक्क व स्वातंत्र्यमारक 'पुतना' ही संबोधण्यात आले. संगणक क्रांती घडवून आणणाऱ्या राजीव गांधीना दुबळा मानले तर नेतृत्वासाठी चाचपडणाऱ्या काँग्रेसला निर्धारपूर्वक उभारी देवू पाहणाऱ्या सोनियांच्या निष्ठांना संशयाने पाहण्यात आले. यापैकी वास्तव काय व विपर्यास काय हे समजून घेण्याचा तटस्थपणे प्रयत्न फार थोड्यांनी केला आहे.

भारताची जागतिक राजकारणातील भूमिका स्वातंत्र्यपूर्व काळापासूनच घडत गेली आहे. समृद्ध ऐतिहासिक, सांस्कृतिक, वैचारिक वारसा व स्वातंत्र्य आंदोलनाचे नेतृत्व करणाऱ्या राष्ट्रीय काँग्रेसमधील पुढाऱ्यांचा दृष्टिकोण आणि गांधी-नेहरुंचे तत्कालीन जागतिक व्यवस्थेचे आकलन यातून भारताच्या परराष्ट्रीय भूमिका साकार होत गेल्या. असे असले तरी ब्रिटनच्या भारताविरोधी भूमिकांना विरोध व काळाची गरज या स्वरुपातील प्रतिक्रियांच्या रुपातच तत्कालीन परराष्ट्र भूमिका समजून घ्याव्या लागतात. सार्वभौम राज्य आपले अल्पकालीन व दीर्घकालीन हित कशात आहे हे लक्षात घेऊन जाणीवपूर्वक काही भूमिका घेत असते असे खचितच त्याचे स्वरुप नव्हते. लॉर्ड डलहौसी यांची भारताच्या संदर्भातील 'पृथकतानीति' (Isolation Policy) ची प्रतिक्रिया म्हणून स्वातंत्र्यपूर्व काळात भारताच्या काही भूमिका घडत गेल्या. चीनला तिबेट घेऊ द्यायचे नाही, अफगाणिस्तानला सुरक्षित ठेवायचे व हिंद महासागर परीक्षेत्रात आपलाच कसा वरचष्मा राहिल या अनुषंगाने धोरणे राबवायची या डलहौसीच्या पृथकतेच्या धोरणाच्या प्रेरणा होत्या. त्याची प्रतिक्रिया म्हणजे स्वातंत्र्यपूर्वकालीन भारताच्या परराष्ट्र भूमिका होत.

स्वातंत्र्योत्तर काळात नेहरुंच्या नेतृत्वाखाली भारताचे स्वतंत्र विदेशनीति धोरण विकसित होत गेले. यात पंडित नेहरु व इंदिरा गांधी केंद्रस्थानी येतात. सोव्हिएत युनियनला भेट दिल्यानंतर नेहरुंच्या जागतिक आकलनात स्पष्टता येत गेली. युद्धकाळात व हंगामी सरकारचे पंतप्रधान असताना विविध ठिकाणी त्यांनी जी भाषणे व वक्तव्ये केली यातून स्वतंत्र भारत कोणती विदेशनीति स्वीकारणार याची बरीचशी कल्पना पाश्चात्त्य जगात येत गेली. यामुळे नेहरुंच्या परराष्ट्र धोरणाच्या प्रेरणा नेमक्या कोणत्या, हे जाणून घेणे नेहरुच्या भूमिकांचे मूल्यमापन करण्यासाठी संयुक्तिक होऊन बसते. भारताच्या परराष्ट्र धोरणाला दिशा देणारी ऐतिहासिक संदर्भ रेषा काही शतके वा सहस्रकापर्यंत भूतकाळात खेचित नेता येऊ शकते. जागतिक शांततेला पर्याय नाही असे ठासून सांगणाऱ्या नेहरुंना श्रीकृष्णचरित्रातून प्रेरणा स्फूली नसेल काय? भाऊबंदकीच्या अग्निकुंडात होरपळून निघालेल्या कौरव-पांडवांच्या युद्धपिपासू वृत्तीला बुद्धीचतुर शिष्टाई करून शांतीला पर्याय असू शकत नाही हे ठासून सांगणाऱ्या श्रीकृष्णाने युद्धाची अपरिहार्यता पुढे आल्यावर महायुद्ध कुंड पेटवून मानवी सभ्यतेला अपायकारक असणाऱ्या मूल्यांची होळी करून धर्मराज्याचे संवर्धन केले.[१] याचा वस्तुपाठ १९७१ सालच्या श्रीमती गांधीच्या भूमिकेत का म्हणून पाहू नये?

राजकारणाचे बाळकडू श्रीमती गांधीना लहान वयातच मिळाले होते. मोतीलालजी नेहरु हे एक असे प्रस्थ होते की ज्याच्या घरी स्वातंत्र्य आंदोलनाचे नेतृत्व करणारी त्या काळातील आघाडीची मंडळी समाजकारण, राजकारण व अर्थकारणावर विद्वत्तापूर्ण चर्चा करीत. अशा संस्कारातून नेहरु व त्यांच्या मार्गदर्शनाखाली श्रीमती गांधी घडत गेल्या. तुरुंगात असताना नेहरुंनी इंदिरा गांधीना केलेला पत्रव्यवहार त्यांची जागतिक राजकारणाप्रतीची समज विस्तारित करणारा होता. नेहरुंच्या सार्वजनिक व्यक्तित्वाच्या जडणघडणीची पहिली अडीच-तीन दशके स्वातंत्र्य आंदोलनाचे नेतृत्व करणाऱ्या काँग्रेस

व तिच्या कार्यकर्त्यांच्या सहवासात गेली. दादाभाई नौरोजीपासून गांधीजीपर्यंत काँग्रेसमधील महनीय विभूतींच्या विचारप्रकाशात त्यांच्या परराष्ट्रविषयक भूमिका अधिकाधिक उजळून निघत गेल्या. ज्या काळात नेहरुंचा सार्वजनिक जीवनातील वावर अधिक चपखलपणे घडत होता त्या काळात स्वातंत्र्यप्राप्तीसाठी वसाहतवादाला बळी पडलेल्या राज्यांचा संघर्ष जागतिक राजकारणाच्या पृष्ठभागी होता. स्वातंत्र्याचे मूल्य नेहरुंच्या परराष्ट्र धोरणात यामुळेच अग्रस्थानी राहिले आहे.[२] स्वयंनिर्णयाच्या अधिकाराच्या संवर्धनासाठी पुढे चालून अलिप्ततावादी चळवळीचा उदय घडून आला. याशिवाय गौतम बुद्धांचा प्रज्ञा, शील व करुणेचा विचार, वर्धमान महावीरांचा शांतीसंदेश, ज्ञानेश्वरांची 'वसुधैव-कुटूंबकम'ची कल्पना, रानड्यांचा उदारमतवाद, टिळकांचा कणखर बाणा, महर्षी अरविंदांचा अध्यात्मवाद, टागोरांचा आंतरराष्ट्रीयवाद, गांधीजींचा सहजीवन व अहिंसावाद या नेहरुंच्या परराष्ट्र धोरणाच्या मूलभूत प्रेरणा होत्या.

नेहरुंच्या परराष्ट्र धोरणाला याप्रमाणे अनेकानेक पदर आहेत. वसाहतिक काळात सामान्य जनतेचे झालेले प्रचंड शोषण, अठराविश्व दारिद्र्य व त्यात वारंवार पडणाऱ्या भीषण दुष्काळांनी टाकलेली भर यामुळे हवालदिल झालेल्या प्रजेला लोकतांत्रिक समाजवादी धोरणे उभारी देवू शकतील असा विश्वास त्यांना वाटत होता. यामुळे भांडवली देशापासून दोन हात दूर राहून सोव्हिएत संघाशी अधिक जवळीक त्यांनी निर्माण केली. सार्वजनिक क्षेत्राला प्राधान्य देत समाजवादी धोरणे राबविली. याच मार्गावरून जात इंदिरा गांधीनी सोव्हिएत युनियनशी सन १९७१ साली दीर्घ मैत्री व पारस्पारीक सहकार्याचा करार केला. राजीव गांधीपर्यंत ही परंपरा कमी-जास्त प्रमाणात कायम राहिली. परराष्ट्र धोरणातील नेहरु व श्रीमती गांधींच्या सेक्युलर भूमिकांनाही याच प्रकारे परिस्थितीचे संदर्भ आहेत. येथे प्रकर्षाने एक बाब लक्षात ठेवण्यासारखी आहे की काँग्रेसद्वारा धर्मनिरपेक्ष लोकतांत्रिक संसदीय व्यवस्थेचा स्वीकार अपघाताचा परिणाम नव्हता की उदारमतवादी मूल्यांप्रतीच्या आग्रही बांधिलकीचा. भारतीय समाज व त्याची व्यामिश्रता व समृद्ध बहुपदरी विविधता याप्रतीच्या व्यावहारिक समजुतीमधून भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या सेक्युलर भूमिका विकसित होत गेल्या आहेत.[३]

'विविधतेत एकता' या नेहरुवादी संकल्पनेचा उदय या प्रकारे भारतीय समाजवास्तवातून झाला आहे. धार्मिक, भाषिक वा सांस्कृतिक दमन सामंती अथवा सांप्रदायिक शक्तीच्या वाढीला कारणीभूत ठरू शकले असते. येथे सेक्युलॅरिझमचा आशय केवळ धर्माच्या अनुषंगाने न घेता स्वातंत्र्य व पक्षपातरहित निरपेक्षतेच्या संदर्भातही घेतला पाहिजे. तसा तो घेतल्यास महासत्तांप्रतीचा नेहरु व श्रीमती गांधीचा दृष्टिकोण व अरब जगाविषयी त्यांना वाटणारा स्नेह समजून घेता येतो. नेहरुंनी आफ्रो-आशियायी राष्ट्रांच्या संघटनावर भर दिला तर श्रीमती गांधीनी पॅलेस्टीनींचे सर्वेसर्वा यासेर अराफत यांना जाहीर निमंत्रण देवून उघडपणे अरबांची न्याय बाजू घेतली.[४] जनता पक्षाच्या काळात मात्र यात खंड पडला. नेहरुच्या सेक्यूलर भूमिकेला आणखी एक महत्त्वपूर्ण पैलू आहे व तो म्हणजे हिंदू-मुस्लिम धर्मीयातील ऐतिहासिक संघर्ष, ज्याचा थेट परिणाम भारताच्या विभाजनात झाला आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातच भारताची संभाव्य संस्थात्मक बांधणी व जागतिक व्यवस्थेप्रतीच्या आकलनात काँग्रेस व मुस्लिम लीग यांच्यात एकवाक्यता नव्हती तर कायम पृथकताच राहिली.[५] यामुळे भारतातील मुस्लिम अल्पसंख्यांकांच्या अधिकार संरक्षणाचा देशांतर्गत प्रश्न असो की अरबांचे न्याय हक्क सुरक्षित ठेवण्याचा प्रश्न असो पहिल्या तीन दशकात नेहरु व श्रीमती गांधीना सेक्युलर भूमिका घ्याव्या लागल्या ज्याला विरोधी बाकावरून होट बँकेसाठी चालविलेले लांगूलचालन किंवा तुष्टीकरण संबोधण्यात येऊ लागले. परंतु काँग्रेसने त्याकडे दुर्लक्ष करीत दोन्ही बाजूकडील (हिंदू-मुस्लिम) मूलतत्त्ववाद्यांवर हल्ला चढविला या कामी नेहरु व इंदिरा गांधींना अनेक आघाड्यावर विरोध करणाऱ्या डाव्यांचा मात्र पाठिंबा मिळत गेला हे विशेष.[६]

काँग्रेस पक्षाच्या परराष्ट्रविषयक भूमिकांना डाव्यांची साथ हा खूप मजेशीर अनुभव आहे. त्यावर प्रकाश टाकण्यापूर्वी ज्याचा ऐतिहासिक तथ्य म्हणून उल्लेख करता येईल की या देशात परराष्ट्र धोरण व्यापक लोकतांत्रिक राष्ट्रीय सहमतीची (Democratic Nati-

onal Consensus) निष्पत्ती म्हणून कधीच राहिले नाही. ज्याप्रमाणे पाश्चिमात्त्य प्रगत देशात विशेषतः अमेरिकेत परराष्ट्र धोरणावर व्यापक राष्ट्रीय सहमतीचा विशेष प्रभाव पडत असतो तसे भारतात झाले नाही. भारताची स्वातंत्र्योत्तर विदेशनीति नेहरुंच्या जागतिक व्यवस्थेच्या आकलनाची निष्पत्ती होती. स्वातंत्र्य आंदोलनाची पार्श्वभूमी असलेल्या नेहरुंच्या वलयांकित नेतृत्वाचा प्रभाव म्हणा किंवा जनतेची अजागरुकता या देशात व्यापक राष्ट्रीय सहमती जड धरु शकली नाही. साधारणपणे पन्नासच्या दशकात नेहरुंच्या परराष्ट्रविषयक भूमिकांना डाव्यांनी खंबीर पाठिंबा दिला. साम्राज्यवाद, वसाहतवाद व वंशवादी प्रवृत्तीचा निषेध असो की महासत्तांच्या सत्तासंघर्षाच्या राजकारणापासून अलिप्त राहण्याची भूमिका, निःशस्त्रीकरण व शस्त्रनियंत्रणासाठीचा आग्रह असो की युनोला खंबीर पाठिंबा देण्याचे धोरण; डाव्यांची प्रत्येक आघाड्यावर त्यांना साथ मिळत गेली पण हेच चित्र नेहरुंच्या उत्तरार्धात मात्र बदलले. १९६२ च्या चिनी आक्रमणानंतर अलिप्ततेच्या तत्त्वाला नकार दर्शवित नेहरुंना साम्राज्यवाद्यांचा रनिंग डॉग म्हणून डाव्यांनी टीका केली तर उजव्यांनी साम्यवाद्यांचा हस्तक म्हणून उल्लेख केला. जे-जे काही म्हणून सोव्हिएत किंवा चीनसोबतचे त्याला होकार व जे काही भांडवलवाद्यांसोबतचे विशेषतः अमेरिकेबरोबरील त्याला नकार ही डाव्यांची भारताच्या परराष्ट्र धोरणातील भूमिका राहिली आहे. अर्थात यापाठीमागे त्यांच्या वैचारिक निष्ठा वगळल्या तर व्यापक जनहितासंदर्भात शंका घेण्याचे काही कारण नाही. सोनियाच्या काळातील अमेरिकेसोबतचा नागरी अणुकरारापर्यंतचा विचार या संदर्भात करावा.

अर्थात डाव्या व उजव्यांनी नेहरुंचा अलिप्ततावाद नाकारला असला तरी तो अनुपयुक्त होता असे मात्र म्हणता येत नाही. भूराजकीय व तत्कालीन जागतिक व्यवस्थेच्या संदर्भात नेहरुंच्या अलिप्तवादी भूमिका देशाच्या हितसंबंधाचे संवर्धन करण्यात सिद्ध झाल्या आहेत. सोव्हिएत व चीन या साम्यवादी देशांच्या सीमा देशाला लागूनच असल्यामुळे भारताला पश्चिमी भांडवलवाद्यांच्या गटाला जावून मिळणे परवडणारे नव्हते तर साम्यवाद्यांची मार्क्सवादाप्रती असलेली बांधिलकी गांधीवादाचा प्रभाव असणाऱ्या नेहरुंना त्यांच्या अधिक जवळ जाण्यापासून रोखत गेली. भारताला स्वातंत्र्य हे मोल देवून मिळवावे लागले असल्यामुळे स्वातंत्र्याचा संकोच होईल अशी कोणतीही कृती नेहरुंच्या हातून घडणे शक्य नव्हते. भारताची जी स्थिती तीच बहुसंख्य आफ्रिकी, आशियायी व लॅटिन अमेरिकन राज्यांची असल्यामुळे स्वातंत्र्य आंदोलनातून पुढे आलेल्या नासेर, डॉ. सूकार्णो, क्वामे एक्रूमा, टिटो आदी नेतेमंडळींनी स्वयंनिर्णयाचा अधिकार जोपासणाऱ्या अलिप्त धोरणाचा स्वीकार केला. या चळवळीच्या माध्यमातून कोणाच्याही हातचे बाहुले न बनता सदस्य देशांना अभिव्यक्त होण्यास अवकाश मिळत गेला. सत्तासंघर्षाच्या राजकारणात गुंतून न पडल्यामुळे जी स्थिरता व शांतता मिळाली त्याचा उपयोग नियोजनबद्ध पद्धतीने देशाच्या विकासासाठी करता आला. नेहरुंच्या पुढाकाराने १९४९ ला दिल्ली येथे इण्डोनेशियाच्या स्वातंत्र्याच्या संदर्भात आफ्रो-आशियायी देशांची परिषद बोलविण्याची घटना असेल की १९५५ ची याच देशांच्या राष्ट्रवादाला परिपोषित करणारी बांडूंगची शिखर परिषद. १९५६ चे सुवेझ प्रकरण असेल की काँगो व कोरियाची समस्या, वंशवादी द. आफ्रिकेचा धिक्कार असो की क्युबा प्रकरणातील सन १९६२ ची यशस्वी मध्यस्थी या सर्व भूमिकांचा अविष्कार अलिप्ततेच्या मंचावर स्वतंत्र बाण्यातून होऊ शकला ही या चळवळीची नेहरुकालीन मोठी उपलब्धी आहे.

श्रीमती गांधी व पुढे राजीव गांधीच्या काळात मात्र अलिप्ततावादी चळवळींचा नैतिक आशय लुप्त झाला. १९७१ च्या भारत-पाक युद्धात वाशिंग्टन-पेकींग-पिंडी अक्ष भारताच्या विरोधात अस्तित्वात आल्यामुळे सोव्हिएत संघाशी मैत्री संपादन करणे देशाच्या सुरक्षेच्या दृष्टीने इंदिराजींना आवश्यक वाटले. यातून १९७१ चा भारत सोव्हिएत मैत्री व पारस्पारिक सहकार्याचा ऐतिहासिक करार घडून आला. या करारावर पश्चिमी भांडवलशाही देशांनी झाडून टिका केली. भारत कुठे अलिप्त राहिला, तो साम्यवादी गटाला मिळाला असाच एकंदरित टिकेचा सूर होता. १९७४ साली राजस्थानातील पोखरणच्या वाळवंटात 'बुद्ध हसला' या सांकेतिक नावाने श्रीमती गांधीनी यशस्वी अणुचाचण्या घडवून आणल्याची घटना ही अलिप्तनीतिला व्यावहारिक आशय देण्याच्या प्रयत्नाचाच

भाग होता.[७] शांततेतील विकासाकरीता अणूविस्फोट असे जरी त्यास स्वरुप देण्यात आले असले तरी भारत केव्हाही अण्वस्त्रे बनवू शकतो हा संदेश त्यातून गेला हे महत्त्वाचे होते. नेहरुंनी भारतीय परराष्ट्रनीतिला ज्या उच्च नैतिक तत्त्व व जागतिक पातळीवर ठेवण्याचा प्रयत्न केला त्याच ठिकाणी श्रीमती गांधींनी व्यावहारिक व प्रादेशिक पातळीवर आणण्याचा प्रयत्न केला. परंतु गेल्या साठ वर्षात भारताच्या एकूणच अलिप्तनीतिचा विचार केला तर ती घड्याळाच्या लंबकाप्रमाणे कधी साम्यवाद्यांकडे तर कधी भांडवलवाद्यांकडे हिंदोळत राहिली एवढे मात्र नक्की.

स्वातंत्र्योत्तर काळातील पहिल्या तीन दशकातील भारताच्या परराष्ट्र धोरणाचा आकृतीबंध रेखाटत असतांना 'नेहरुंनी परराष्ट्रधोरणात राष्ट्रहिताची हेळसांड केली' या आरोपाची ही दखल घेतली पाहिजे. डाव्या-उजव्या व खुद्द काँग्रेसमधील उदारमतवाद्यांनी या संदर्भात अनेक आरोप केले आहेत. आंतरराष्ट्रीय संबंधावर भाष्य करणा-या यथार्थवादी तसेच आदर्शवाद्यांनी परराष्ट्र धोरणात राष्ट्रहिताचा विचार महत्त्वपूर्ण मानला आहे. आरनोल्ड बूल्फर्स सारख्या यथार्थवाद्यांनी राष्ट्रहिताला 'परराष्ट्र धोरणाचा आत्मा' म्हटले आहे तर जोसेफ फ्रँकेलनी 'परराष्ट्र धोरणाची मूलभूत धारणा' संबोधले आहे. आदर्शवाद्यांची धारणाही यापेक्षा वेगळी नाही. सन १९४७ साली संविधान सभेला संबोधित करतांना नेहरु म्हणाले होते की, 'आम्ही कोणत्याही विदेशनीतिचा स्वीकार केला तरी त्याचा आधार राष्ट्रहितच असला पाहिजे. देशासाठी सर्वाधिक लाभदायक काय आहे हे जाणून घेण्यातच विदेशनीतिच्या संचालनाचे कौशल्य सामावले आहे[८]. नेहरुंच्या परराष्ट्र धोरणाचे गाभातत्त्व म्हणून 'सहजीवन, शांतता व अहिंसा' या मूल्यांसंदर्भात अनेकानेक आरोप झाले आहेत. ज्याचा उल्लेख लेखाच्या पूर्वार्धात केला आहे. १९५४ साली चीनसोबत केलेला पंचशील करार, अलिप्त राहण्याचा निर्धार, लष्करी सज्जतेकडे जाणीवपूर्वक केलेले दुर्लक्ष, शेजाऱ्यांची आक्रमणे पोकळ शांततावाद या सर्व भूमिका वादग्रस्त ठरून टीकेस पात्र ठरल्या. नेहरुंच्या उपरोक्त भूमिकांचे मूल्यमापन त्यांच्या जागतिक व्यवस्थेच्या आकलनाच्या एका बाजूने झाले पाहिजे त्याच वेळी त्याच्या परराष्ट्रधोरणात ज्या विसंगतीना आधोरेखीत करण्यात आले तो कालावधी व स्थिती काय होती याचाही विचार केला पाहिजे. शिवाय नेहरु ज्या तार्किक वारशाचे उत्तराधिकारी होते तोही भाग लक्षात घेतला पाहिजे.

तत्कालिन जागतिक व्यवस्थेचे स्वरुप काय होते? नुकतेच विध्वंसक युद्ध संपले होते. अण्वस्त्रांनी आपली संहारकता सिद्ध केली होती. युद्धकाळातील दोस्त राष्ट्रांच्या मैत्रीला दरार पडून विचारप्रणालीच्या आधारे जगाचे ध्रुविकरण झाले होते. आपापल्या गटाचे प्राबल्य राखण्यासाठी महासत्तांमध्ये अक्षरशः रस्सिखेच सुरू होती. अशा स्थितीत शीतयुद्धाचे रुपांतर गरम युद्धात केव्हा होईल याची शाश्वती नव्हती. या पार्श्वभूमीवर नेहरुंचा अलिप्ततावाद व तद्अनुषंगिक शांती आणि सहजीवनविषयक भूमिका तपासल्या पाहिजेत. विचारप्रणालीने विभाजित झालेल्या जगात नवस्वतंत्र राज्यांनी कोणत्याही एका गटाच्या चळवळीला जाणे निर्णय स्वातंत्र्याच्या हक्कावर पाणी सोडणे नव्हते काय? नवोदित शक्तिशून्य राज्यांच्या राष्ट्रवादाला महासत्ता कुरतडत असतांना राजकीय स्वातंत्र्य प्राप्तीमुळे स्वतंत्रपणे अभिव्यक्त होण्याचा राजकीय अवकाश असंलग्नतेच्या रुपाने या राज्यांनी जोपासण्याचा प्रयत्न केला तर त्यात काय चुकले? विध्वंसक शस्त्रास्त्रांच्या निर्मितीसाठी स्पर्धा करणाऱ्या पश्चिमी भांडवलवाद्यांना निःशस्त्रीकरण, शस्त्रनियंत्रणासाठी अनुकूल करणेच शहाणपणाचे नव्हते काय? वसाहतवादी काळात पार पिळून निघालेल्या भारताने नेहरुंच्या नेतृत्वाखाली औद्योगिकरण, नियोजनबद्ध पद्धतीने आर्थिक विकास यासाठी गुंतवणूक करणे लष्करी सज्जते-साठी गुंतवणूकीपेक्षा किफायतशीर नव्हते काय? युद्ध हे कोणत्याही समस्येचे अंतिम उत्तर कधीच असू शकत नाही. युद्धामुळे प्रश्न सुटत नसतात ते सुटल्या सारखे वाटतात पण गुंता वाढता जावून ते दुसऱ्या सर्वंकष युद्धाला आमंत्रित करतात ही मालिका अशीच सुरू राहून विनाश घडतच राहतो. शांती व सहजीवनाला पर्याय असू शकत नाही हेच तर नेहरु यानिमित्ताने सांगत होते.

नेहरुंचा शांततावाद व अहिंसा आणि त्यांच्या हयातीतील देशी संप्रदायवाद व हिंसा या दोन बाबी परस्परविरोधी म्हणून बऱ्याच वेळा सादर केल्या जातात. आंतरराष्ट्रीय संबंधात बलप्रयोग व हिंसेच्या विराधी असणाऱ्या नेहरुंनी गोवा मुक्ती, हैद्राबाद, जुनागढ व काश्मिरच्या प्रश्नात बलप्रयोगाचा वापर व हिंसेला दिलेली मान्यता हे परस्परविरोधी असल्याचे बोलले जाते. हे खरे आहे की नेहरु ज्या काळात शांतीदूत म्हणून वावरत होते तो काळ देशांतर्गत सांप्रदायिक व अस्मितावाचक हिंसानी होरपळून निघत होता. परंतु देशांतर्गत हिंसाचारासाठी नेहरुंच्या शांती धोरणाच्या अपयशाला जबाबदार धरणे गैर आहे. देशी हिंसा केवळ विभाजनाचा परिणाम नव्हता तर त्यापाठीमागे ऐतिहासिक व सांस्कृतिक विलगतेची अधिबलने कार्य करीत होती याकडे दुर्लक्ष कसे करता येईल? मुजोर संस्थानिक, अनिर्बंध अत्याचारी सामंत नवपरिणीत लोकशाहीत शिकावू राजकीय उमेदवारी करीत होते त्यामुळे भाषिक, सांप्रदायिक अस्मिताधारीत हिंसांना त्यांच्याकडून प्रोत्साहन मिळणे शक्य होते. पोलिस दलाला सक्षम करून व प्रसंगी लष्करी हस्तक्षेप करून देशाची एकता आणि कायदा व सुव्यवस्था संरक्षित करणे महत्त्वाचे होते. नेहरुंनी त्यावेळी हेच केले. देशातील जनता स्वातंत्र्याचा आनंद घेत असतांना गोमंतकांना सत्तांध पोर्तुगीजांच्या वरंवट्याखाली राहू देणे उचित होते काय? वारंवार विनंत्या करूनही पोर्तुगीज सरकार दाद देत नसेल तर बलप्रयोग करून जनतेला जाचातून सोडविणे हा एकमेव मार्ग शिल्लक राहतो. स्वतःच्या देशात स्वातंत्र्याच्या मूल्याबद्दल अत्यंत आग्रही असणाऱ्या अध्यक्ष केनेडींचा सल्ला मानून स्वस्थ बसले असते तर गोव्यावर पाणी सोडावे लागले असते.[९]

नेहरुकालीन भारताच्या परराष्ट्रधोरणाचा समिक्षणात्मक आलेख मांडीत असतांना संयुक्त राष्ट्रसंघात काश्मिरचा प्रश्न उपस्थित करणे व राष्ट्रकुलचे सदस्यत्व कायम करण्याच्या निर्णयाचा प्रकर्षाने उल्लेख होतो. काश्मिरचा प्रश्न संयुक्त राष्ट्रसंघात उपस्थित करून नेहरुंनी समस्येचे आंतरराष्ट्रीयकरण केले असा ठपका त्याच्यावर ठेवला जातो. या बाबत वस्तुस्थिती अगोदर समजून घेतली पाहिजे. काश्मिरात पाकिस्तानने आक्रमण केले होते. प्रश्न वादाचा बनविला होता, बऱ्याचशा भूभागावर अनधिकृत कब्जा मिळविला होता. अशा स्थितीत नेहरुंनी यूनोच्या सनदेच्या प्रकरण VI नुसार प्रश्न उपस्थित करण्याचा निर्णय घेतला की जे वादग्रस्त प्रश्नांची शांततामय मार्गांनी सोडवणूक करण्याला समर्पित आहे.[१०] प्रकरण VII मध्ये आक्रमणाची व्याख्या केली आहे. भारत त्यावेळी जगाला टाहो फोडून सांगत होता की पाकने आमच्या भूमीवर आक्रमण केले आहे याबाबत जागतिक समूदायाने न्याय करावा. यासाठीच नेहरुंनी प्रश्न यूनोत उपस्थित केला. महासत्तांच्या गटबाजीने तेव्हा व आताही संयुक्त राष्ट्रसंघाला फ्रॅक्चर केले आहे. त्यामुळे प्रश्न भिजत राहिला परंतु यासाठी नेहरुंना दोषी ठरविणे संयुक्तिक वाटत नाही. अखेर तो काळच आंतरराष्ट्रीय संस्थांच्या उपयुक्ततेची चाचपणी करण्याचा होता हे विसरता येत नाही. बरे हा निर्णय एकट्या नेहरुंचा होता काय? त्याला कॅबिनेटची मान्यता नव्हती काय? सरदार पटेल, डॉ. शामाप्रसाद मुखर्जी, डॉ. बी. आर. आंबेडकर व पुढे कृष्णमेनन यांसारखी मातब्बर मंडळी कॅबिनेटमध्ये होती. तेव्हा हा निर्णय सर्वसहमतीचा होता हे लक्षात घेतले पाहिजे. या घटनेचा तात्कालिक परिणाम सीमाभागात शांतता व जैसे थे स्थितीत झाला पण प्रश्न धसास लागला नाही तर दूरगामी परिणाम महासत्तांनी तो चिघळ-वीत ठेवून द. आशियात आपल्या हितसंबंधाचे जतन करण्यात झाला. यानिमित्ताने माऊंटबॅटन, ॲटली व नोयल यांना प्रश्न मिटवायचा नव्हता हेही उघड झाले.

याव्यतिरिक्त राष्ट्रकुलचे सदस्यत्व, चीन संदर्भातील रोमॅन्टिक दृष्टिकोण, स्थानिक प्रश्नांऐवजी जागतिक प्रश्नांना प्राधान्य देण्याचे धोरण आदी नेहरुंच्या भूमिका वादग्रस्त ठरल्या. चौ-एन-लाय व माओचे मनसुबे नेहरुंना ओळखता आले नाहीत. १९६२ च्या पराभवाची सल लष्करी अधिकारी आजही विसरु शकत नाहीत. तिसऱ्या जगातही भारताची प्रतिष्ठा यामुळे कायमची खालावली याबाबत नेहरुंचे बोल त्यांच्या पश्चातापदग्ध मनाची साक्ष पटवितात. ते म्हणाले होते की, 'आम्ही स्वतःच निर्माण केलेल्या भावविश्वात जगात वावरत होतो' या प्रसंगातून नेहरु सावरु शकले नाहीत. सन १९६४ ला त्यांचे

दु:खद निधन झाले. पुढे लालबहादूर शास्त्रींच्या रूपात भारताला एक चांगला चारित्र्यवान पंतप्रधान मिळाला पण दुर्दैवाने त्यांचेही अल्पकाळातच दुर्दैवी निधन झाले. १९६५ च्या पाकबरोबरील युद्धात विजय मिळवून भारत आता १९६२ चा राहिला नसल्याची झलक त्यांनी जगाला दाखविली. सीमा सुरक्षा करणाऱ्या जवानांना व समृद्धीचे हिरवे स्वप्न साकार करणाऱ्या किसानांचा त्यांनी गौरव केला. 'जय जवान, जय किसान'च्या घोषणांनी संबंध भारत शहारून उठला.

नेहरुंनी आपल्या कार्यकाळात ज्या ज्या चुका केल्या त्या श्रीमती गांधींनी टाळल्या. आंतरराष्ट्रीय संबंधात वैयक्तिक प्रभावापेक्षा शक्तिला अधिक महत्त्व असते आणि नीतिमत्तेपेक्षा सामरिक हितसंबंधाना अधिक महत्त्व असते याचा वस्तुपाठ म्हणजे इंदिरा गांधीचे परराष्ट्रीय धोरण होते. त्यांनी आपल्या कुशल नेतृत्वाने तिसऱ्या जगाला स्वतंत्र अस्मिता प्रदान केली. मानवता, शांतता व सामाजिक न्यायाच्या संदर्भात युनो गतिशील झाली पाहिजे अशी स्पष्ट भूमिका नामच्या मंचावरून अनेकदा घेतली. NPT वर स्वाक्षरी करण्यास स्पष्ट नकार देऊन महासत्तांच्या भेदभावपूर्ण व्यवहाराला विरोध करून स्वतंत्र बाण्याचा परिचय दिला.[११] स्वत:च्याच भूमीत उपरे झालेल्या पॅलिस्टिनींची न्याय बाजू घेतली. १९७१ च्या बांग्लादेश प्रकरणात त्यांच्या अजोड साहस, दुर्दम्य इच्छाशक्ती व कुटनीतिक राजनीतीज्ञाचा परिचय झाला. बांग्लादेश प्रकरणात श्रीमती गांधींच्या दोन भूमिकांचा उल्लेख करणे महत्त्वपूर्ण ठरेल. एक बांग्लादेशाला एक सार्वभौम देश म्हणून ताबडतोब मान्यता देणे, दोन पाक-सोबतच्या युद्धात एकतर्फी युद्धबंदी जाहीर करणे.[१२] बांग्ला-देशाला स्वतंत्र सार्वभौमदेश म्हणून मान्यता देण्यास थोडा जरी उशीर झाला असता तर कदाचित भारतीय उपखंडाचा इतिहास आज वेगळाच पहावयास मिळाला असता. पाकचा भारताकडून पराभव, मुक्ती मोर्चाचा संघर्ष या बाबी पाकिस्तानच्या एकात्मतेला भंग करण्यास पुरेशा ठरल्या असत्या काय हे ठरविणे कठीण आहे. शिवाय अध्यक्ष रिचर्ड निक्सनचा दबाव काय गुण उधळू शकला असता हे सांगणेही कठीण आहे. कदाचित एकसंघ पाकिस्तान कदाचित पाकिस्तान राज्यसंघाचा स्वायत्त भूभाग यापैकी कोणतीही स्थिती राहिली असती तर ते भारताच्या हितसंबंधाच्या विरोधीच गेली असती. दुसरे म्हणजे कॅबिनेटमधील अनेक वरिष्ठ सदस्य व लष्करातील वरिष्ठ अधिकाऱ्यांचा विरोध असतांनाही श्रीमती गांधींनी एकतर्फी युद्धबंदीचा निर्णय घेऊन सर्वांनाच चकित केले. पाक शरणागतच्या अवस्थेत असताना व जिथे इतिहास बदलण्याची संधी असताना त्यांचा निर्णय अनेकांना चुकीचा वाटू लागला.

परराष्ट्रीय धोरणात या नजरेत भरणाऱ्या यशसिद्दीला दोन घटनांमुळे कायमचा कलंक लागला. जून १९७५ ला सत्तेच्या लोभाचा परिणाम राज्य आणीबाणीत झाला. जनतेचे नागरी अधिकार चिरडल्यामुळे श्रीमती गांधींची प्रतिमा कायमची खालावली. काँग्रेसपक्षाचे कधीही भरून न निघू शकेल एवढे नुकसान झाले. दुसरी घटना 'ऑपरेशन ब्ल्यूस्टार'ची होती. सुवर्णमंदिरात आश्रय घेतलेल्या फुटिर-तावादी बंडखोर भिंद्रनवाले व त्यांच्या सहकाऱ्यांना ताब्यात घेण्यासाठी लष्कराला पाचारण करावे लागले. शेकडो निरपराध शीख यात्रेकरूंना यात प्राण गमवावे लागल्यामुळे शीख समाजात खोलवर पसरलेल्या असंतोषाचेच बळी श्रीमती गांधींना व्हावे लागले. अशा प्रकारे संगीत, पुस्तके, कला व पर्वतशिखरांवर प्रेम करणाऱ्या श्रीमती गांधी प्रसंगी कठोर राजनीतिज्ञ व गुंतागुंतीचे व्यक्तिमत्त्व अस-णाऱ्या लेडी म्हणून स्मरणात राहतील.

नेहरु व श्रीमती इंदिरा गांधीचा वसा वारसा थोड्या फार फरकाने पंतप्रधान राजीव गांधीनी चालविल्यामुळे त्यांच्या परराष्ट्रीय धोरणावर विस्तृतपणे भाष्य करण्याची आवश्यकता येथे वाटत नाही. संगणक क्रांतीचा पाया रचणाऱ्या या उमद्या पंतप्रधानालाही अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. जागतिकीकरण व उदारीकरणासाठी पश्चिमी भांडवलवाद्यांच्या दबावाला त्यांनी भीक घातली नाही. देशांतर्गत उद्योगांना सतत प्रोत्साहन दिले. विकास, स्वातंत्र्य, शांतता आणि नि:शस्त्रीकरण या परस्परसंबंधीत बाबी असतात याची जाण ठेवून परराष्ट्रीय धोरणे आखली. दुर्दैवाने श्रीलंकेत शांतीसेना पाठविण्यासंबंधीचा निर्णय त्यांच्या जीवावर बेतला. पण या निर्णयाचे सामरिक महत्त्व दुर्लक्षित करता येत नाही. आज चीन ज्या पद्धतीने श्रीलंकेशी सामरिक गुंतवणूक करीत आहे त्यावरून

अनुक्रमणिका

तरी राजीव गांधीच्या तत्कालीन निर्णयाचे महत्त्व समजून घेतले पाहिजे.

आज आपण अशा कालखंडात उभे आहोत की जिथे जागतिकीकरण, उदारीकरण व खासगीकरणाची दोन आवर्तने पूर्ण झाली आहेत. नेहरुवादी परराष्ट्रीय धोरणाला साडेचार तर श्रीमती गांधींच्या परराष्ट्रीय धोरणाला अडीच दशके पूर्ण झाली आहेत. सोनिया गांधी, घराण्याचा वारसा चालवित आहेत. राहुल गांधी त्याच्या तालमीत राजकारणाचे धडे गिरवित आहेत. खरे म्हणजे लोकशाहीत घराण्यांची सत्तेवरील मक्तेदारी लोकांच्या अंगवळणी कशी पडली हा संशोधनाचा स्वतंत्र विषय आहे तरी भारताच्या राजकारणात आज तरी हीच वस्तुस्थिती आहे. अशा स्थितीत आपल्या पुढ्यात वाढून ठेवलेल्या आव्हानांच्या संदर्भात विद्यमान राजकीय नेतृत्वाने अगरबत्ती घेऊन पूजा करणे वा टोकाच्या मूर्तिभंजकाचा अविर्भाव निग्रहपूर्वक टाळून नेहरु व श्रीमती गांधींच्या परराष्ट्रीय भूमिकांचा आजच्या संदर्भात विचार केला पाहिजे. दहशतवाद, ग्लोबल वॉर्मिंग, मानवी हक्कांची पायमल्ली, वंशवादी उद्रेक, शस्त्रस्पर्धा यासारख्या प्रश्नांच्या संदर्भात नव्याने भूमिका घेतल्या पाहिजेत. याचा मुकाबला विशुद्ध नेहरुवादाच्या मार्गाने होणे शक्य आहे का याचा विचार झाला पाहिजे. परराष्ट्रीयनीती परिस्थितीचे अपत्य असते याचे भान ठेवून हेतूपूर्वक केलेल्या त्याच्या जडणघडणीतून देशाच्या महासत्तेचा मार्ग प्रशस्त होईल अशी आशा करू या.

**संदर्भ :**


१) डॉ. भवानीलाल भारतीय (१९८१) : 'श्रीकृष्ण चरित' गोविन्दराम हासानन्द, प्रकाशन, दिल्ली – ११०००६.

२) A. K. Damodaran (1986):'Jawaharlal Nehru and world order' Mainstream, Vol XLV No. 48.

३) Sitaram Yechury (2009) : 'Shifting sands of Indian Politics', Seminar.

४) M. Saleem Kidwai (         ) : 'Indira Gandhi-An outstanding International Leader' Mainstream Vol XLV, No. 45.

५) A. K. Damodaran (1986) :'Jawaharlal Nehru and World order', Mainstream Vol XLV No. 48.

६) A. K. Damodaran (1986) :'Jawaharlal Nehru and World order', Mainstream Vol XLV No. 48.

७) C. Sheela Reddy : (        ) 'Indomitable Indira strategist Par Excellence' Meanstream. Vol X No. 47.

८) Nehru's speech in the constituten Assembly (Legislative) December 4, 1947, India's Foreign Policy, Selected speeches, September 1946-April 1961 by Jawaharlal Nehru, The Publications Division, Ministry of Information and Broadcasting Government of India.

९) V. Sudarshan (1997) : 'Towards 50 Years of Indian Foreign Policy : Nehru's Ghost is an Oxymoron', India 50 Years of Independence, 2nd Vol. Edited by verinder Grover and Ranjana Arora, Deep and Deep Publication, New Delhi - 110027.

१०) K. Natwar Singh (2009) : 'Nehru as P. M. and Foreign Minister', Mainstream, Vol XL Vii, No. 49, November 21, 2009.

११) M. Saleem Kidwai (       ) : 'Indira Gandhi' - An Outstanding International Leader' Mainstream, Vol. XLV, No. 45.

१२) C. Sheela Reddy (2007) : 'Indomitable Indira - Strategist par Excellence', Mainstream, Vol. XLV No. 47.


❖❖❖

# इंदिरा गांधींचे वर्चस्व व संस्थात्मक ऱ्हास

प्रा. शैलेंद्र खरात

**भारतीय राष्ट्रीय काँग्रेस (१९६० ते १९८५) :**

१९६० ते १९८५ हा भारतीय राजकारणातील अत्यंत महत्त्वाचा कालखंड आहे. याचे महत्त्वाचे कारण असे की १९९० नंतर भारतीय राजकारणाला जी कलाटणी मिळाली त्याची तयारी १९६० ते १९८५ या कालखंडात झालेली दिसते. १९९० नंतर हिंदुत्व आणि मंडल या मुद्द्यांनी भारतीय राजकारण मुळापासून ढवळून काढले. यामुळे भारतीय राजकारणात नवीन पक्षपद्धतीचा उदय झाला. तर हिंदुत्वाचे, मागास जातींचे राजकारण आणि भारतीय पक्षपद्धतीमधील बदल या तीनही गोष्टींची रूजवात १९६० ते १९८५ या कालखंडात भारतीय राजकारणात झालेली दिसते.

**प्रास्ताविक :**

१९६० च्या दशकाची सुरुवातच चीनने भारतावर केलेल्या आक्रमणाने झालेली दिसते (१९६२). या युद्धात मानहानिकारक पराभव पत्करावा लागल्याने नेहरुंच्या नेतृत्वाखालील केंद्रसरकार काळवंडून गेलेले दिसते. यापेक्षा मोठा धक्का काँग्रेस पक्षाला यानंतर दोन वर्षांनी बसला — तो म्हणजे नेहरुचे निधन. 'नेहरुनंतर कोण?' 'नेहरुनंतर भारताचे काय होणार?' अशा प्रकारच्या चर्चा विचारवंतांमध्ये होत असतानाच, एका विशिष्ठ परिस्थितीत इंदिरा गांधी या नेहरुंच्या कन्येला नेहरुंच्या निधनानंतर दोन वर्षांनी – भारताचे पंतप्रधानपद भूषवावे लागले. 'गुंगी गुडिया' अशी सुरुवातीला संभावना झालेल्या या नेहरुंच्या कन्येने पाहता पाहता पुढे काँग्रेसवर आणि भारतीय राजकारणावर आपले एकहाती प्रभुत्व प्रस्थापित केले. वर, म्हटल्याप्रमाणे एका विशिष्ठ प्रकारच्या परिस्थितीत इंदिरा गांधींना १९६६ साली देशाच्या पंतप्रधान व्हावे लागले. काय होती ही परिस्थिती? ही परिस्थिती मुळापासून समजावून घेणे फार गरजेचे आहे, कारण या परिस्थितीमध्येच त्यावेळच्या काँग्रेस या पक्षाचा चेहरामोहरा आपल्याला पाहायला मिळतो. १९६६ साली, तेव्हाचे पंतप्रधान लाल बहादूर शास्त्री यांच्या अकाली निधनामुळे नवीन पंतप्रधान नेमण्याची वेळ काँग्रेसच्या राष्ट्रीय पातळीवरील संघटनेवर आली. यावेळी, काँग्रेसचे वेगवेगळ्या राज्यात असणाऱ्या प्रभुत्वशाली नेत्यांची काँग्रेसच्या केंद्रीय संघटनावर पकड होती या नेत्यांनी शास्त्रीजींच्या वारसदाराच्या नावावर एकमत न झाल्याने, १३ मुख्यमंत्र्यांच्या पाठिंब्याने सर्व गटांच्या बाहेरील उमेदवार म्हणून इंदिरा गांधींच्या नावाची शिफारस केली आणि काँग्रेस संसदीय पक्षाने इंदिरा गांधींना बहुमताने पंतप्रधान म्हणून निवडून दिले (ऑस्टीन, १९९९ : १७४). शिवाय काँग्रेस संघटनेतील या प्रबळ नेत्यांपैकी – ज्यांना 'सिंडिकेट' म्हटले जावू लागले – कामराज आणि इतर नेत्यांना असे वाटत होते की ते इंदिरा गांधींच्या नेतृत्वावर नियंत्रण ठेवू शकतील व त्यांच्या नावावर निवडणुका जिंकता येतात. पक्षातील अनेकांचे तेव्हा असे मत होते की इंदिरा गांधी या तात्पुरत्या पंतप्रधान आहेत – १९६७ च्या सार्वत्रिक निवडणुकांपर्यंतच्या (कित्ता : १७५)

**दोन आव्हाने :**

या पुढील तीन वर्षांच्या काळात इंदिरा गांधींच्या नेतृत्वाला दोन आव्हानांचा सामना करावा लागला. पहिले आव्हान होते निवडणुकांच्या पातळीवरचे तर दुसरे आव्हान होते, काँग्रेस संघटनेवर पकड निर्माण करण्याचे. १९६७ साली झालेल्या लोकसभेच्या व विधानसभेच्या निवडणुकीत काँग्रेसला मोठा फटका बसला. लोकसभेत काँग्रेसला बहुमत मिळालेले असले तरी ते मोठ्या प्रमाणावर घटले, तसेच काँग्रेसला मिळालेल्या मतांच्या टक्केवारीनेही स्वातंत्र्यानंतरच्या सर्वात कमी काँग्रेस मतांचा आकडा गाठला. (४०.८%) १९५२ ते १९६२ या दरम्यानच्या पहिल्या तीन लोकसभा निवडणुकांत काँग्रेसच्या जागा ३६० पेक्षा कमी झालेल्या नव्हत्या. १९६७ च्या निवडणुकीत त्या २८३ वर आल्या. यापेक्षा मोठा धक्का होता राज्यांमधला. १९६७ मध्ये झालेल्या विविध राज्यांच्या विधानसभा

अनुक्रमणिका

निवडणुकीत आठ राज्यांमध्ये कॉंग्रेसला सत्तेतून पायउतार व्हावे लागले (श्रीधरन, २००२ : ४८१). यानंतर दोनच वर्षात इंदिरा गांधी आणि कॉंग्रेस संघटनेतील प्रभावशाली नेतृत्व यांच्यातील संघर्षाने टोक गाठले. १९६९ साली राष्ट्रपतीचा उमेदवार कोण असावा. या मुद्द्यावरून झालेल्या संघर्षाने या वादाला तोंड फुटले. परिणामी कॉंग्रेस पक्षात फूट पडली.

**नेतृत्वाची संरचना :**

खरतर १९५० च्या दशकापासून कॉंग्रेस पक्षात नेतृत्वाची विशिष्ट संरचना तयार झालेली दिसते. यानुसार, केंद्रीय पातळीवर पंडित नेहरु हे कॉंग्रेसच नेतृत्व करताना दिसतात, तर राज्य पातळीवर उच्च जातीय प्रबळ जमीन मालक हे कॉंग्रेसच नेतृत्व करीत होते. जमीन सुधारणा आर्थिक नियोजन या कार्यक्रमांच्या आधारे नेहरु समाजवादी कार्यक्रम राष्ट्रीय पातळीवरून रेटत होते. मात्र यापैकी अनेक योजनांची अंमलबजावणी राज्यपातळीवरच्या कॉंग्रेस नेतृत्व आणि सरकारकडे सोपवावी लागली होती. अर्थातच जमीन सुधारणांसारख्या ज्या योजनांमुळे कॉंग्रेसच्या राज्यातील नेतृत्वाच्या हितसंबंधांना धोका पोचण्याची शक्यता होती त्या योजना तयार करण्यामध्ये व त्याची अंमलबजावणी करण्यामध्ये या राज्य पातळीवरील नेतृत्वाने अनेक पळवाटा काढून ठेवलेल्या होत्या. मुद्दा असा की समाजवादी व लोककल्याणकारी चेहरा असलेले केंद्रिय नेतृत्व आणि तळपातळीवरील जाती-जमातीची हितसंबंधाची गणित बांधून प्रबळ हितसंबंधांची पाठराखण करणार राज्य पातळीवरील नेतृत्व यामुळे कॉंग्रेसपक्ष देशात सर्वत्र लोकांचा पाठिंबा मिळवून निवडणुका जिंकण्यात यशस्वी होत असे. १९६४ साली नेहरूंच्या झालेल्या निधनामुळे कॉंग्रेसच्या केंद्रीय पातळीवर नेतृत्वाची पोकळी निर्माण झाली. अर्थात ही पोकळी राज्यपातळीवर प्रस्थापित झालेल्या कॉंग्रेस नेतृत्वाने भरून काढली. या राज्य पातळीवरील नेत्यांमध्ये मुख्यतः मद्रास प्रांतातून के. कामराज, बंगालमधून अतुल्य घोष, मुंबई/महाराष्ट्रातून स. का. पाटील, मैसुर प्रांतातून के. निजलिंगप्पा व आंध्र प्रदेशातून संजीव रेड्डी यांचा समावेश होता. या नेतृत्वालाच 'सिंडीकेट' असे म्हटले जावू लागले. १९६० नंतरच्या कॉंग्रेसबद्दल मुद्दा असा की १९६६ साली इंदिरा गांधी जेव्हा पंतप्रधान झाल्या तेव्हा कॉंग्रेसचे केंद्रीय नेतृत्व या सिंडिकेटच्या ताब्यात होते. वर म्हटल्याप्रमाणे, इंदिरा गांधी आपल्या म्हणण्यानुसार काम करतील अशी या सिंडिकेटमधील काही नेत्यांना तरी खात्री होती. अर्थात, सिंडिकेटच्या या विश्वासाला कारणेही तशीच होती. एकतर, सिंडिकेटमधीलच एका गटाच्या पाठिंब्याने इंदिरा गांधी पंतप्रधान झाल्या होत्या. दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे तेव्हा पर्यंत तरी, इंदिरा गांधींनी लोकांमध्ये स्वतःला पाठिंबा तयार केलेला नव्हता. यामुळे निवडणुका जिंकण्यासाठी श्रीमती गांधींना सिंडीकेट नेत्यांच्या राज्याराज्यातील पाठिंब्यावर अवलंबून रहावे लागणार हे उघड होते. मात्र, त्याचवेळी हेही नमूद करायला हवे की या राज्यपातळीवरील नेत्यांमध्ये अनेक प्रकारचे गट-उपगट अस्तित्वात होते. या गटा-गटांमध्ये प्रचंड संघर्ष व ताणतणाव होते. नेहरु पंतप्रधान असतानाच्या काळात राज्यांतील ह्या पक्षांतर्गत संघर्षात कोणत्या गटाच्या बाजून निर्णय घ्यायचा हे नेहरुंच्या नेतृत्वाखालील पक्षाच केंद्रीय नेतृत्व ठरवत असे. अर्थात हे करताना प्रत्येक गटाची राज्याच्या राजकारणावरची पकड, राज्यातील कॉंग्रेसवर या निर्णयाचा होणारा चांगला-वाईट परिणाम, उभरत्या नेतृत्वाला मान्यता देणे या बाबी विचारात घेतल्या जात. मात्र, नेहरुंच्या निधनानंतर १९६९ सालापर्यंत, वर म्हटल्याप्रमाणे, केंद्रीय नेतृत्वाच्या ठिकाणी पोकळी निर्माण झाली आणि कॉंग्रेसच्या राज्याराज्यातील प्रबळ नेतृत्वाने-सिंडिकेटने-या पोकळीत शिरकाव करून कॉंग्रेस नेतृत्व आपल्या हाती घेतल. अर्थात यामुळे, राज्याराज्यातील कॉंग्रेसी गटा-तटापासून अलिप्त अशी जी कॉंग्रेसच्या नेतृत्वाची प्रतिमा होती ती बदलून या गटांमधील काही गट कॉंग्रेसच नेतृत्व करताहेत अशी प्रतिमा तयार झाली. परिणामी जिल्हा व राज्य पातळीवरील कॉंग्रेसातंर्गत सत्ता स्पर्धा प्रचंड वाढली. कॉंग्रेसच्या केंद्रीय नेतृत्वाचे निवाडे कॉंग्रेसचे राज्यामधील अनेक गट मानेनासे झाले. त्यामुळेच १९६७ च्या निवडणुकांमध्ये अनेक राज्यात कॉंग्रेसमधून फुटून अनेक पक्ष बाहेर पडले, ज्याचा कॉंग्रेसच्या पराभवात मोठा हातभार लागला (कोचानेक, २००२ : ९५). कॉंग्रेसच्या संघटनात्मक पडझडीचेच ते एक लक्षण होते.

अशा परिस्थितीत काँग्रेस पक्षाच्या सरकारमध्ये पंतप्रधानपदी बसलेल्या इंदिरा गांधी यांना हे पंतप्रधानपद टिकवायचे असेल तर देशभरातल्या काँग्रेस पक्षावर आपल नियंत्रण प्रस्थापित करण क्रमप्राप्त होत. राज्य-पातळीवरील नेतृत्वावर आपल केंद्रीय नेतृत्व अवलंबून ठेवल तर काय होत हे त्यांना १९६९ साली राष्ट्रपती-पदासाठीचा उमेदवार ठरवण्यावरून सिंडीकेटच्या नेत्यांशी झालेल्या संघर्षामुळे समजल होत. एका अर्थाने, त्यावेळी त्यांचा सिंडिकेटशी झालेला संघर्ष हे सत्ता संघर्षातील अपरिहार्य प्रकरण होते. या प्रश्नावरून झालेल्या काँग्रेसच्या फुटीनंतर मात्र इंदिरा गांधींनी आपल्या नेतृत्वाखालील काँग्रेस पक्षाची मूलभूत पुनर्रचना करण्यास सुरुवात केली. खरतर या पुनर्रचनेमधील काही भाग त्यांनी याआधी-पासूनच अंमलात आणायला सुरुवात केलेली होती.

**पक्षाची पुनर्रचना :**

काय होती ही पुनर्रचना? स्टेनले कोचानेक (२००२) या अभ्यासकाने एका निबंधात या काँग्रेस पक्षाच्या पुनर्रचनेचा विस्तृत धांडोळा घेतला आहे. या निबंधाच्या आधारेच आपण ही काँग्रेसची पुनर्रचना सम-जावून घेण्याचा प्रयत्न करणार आहोत. एक म्हणजे, इंदिरा गांधींनी काँग्रेस पक्षामध्ये आणि सरकारमध्ये अधि-काराचे प्रचंड केंद्रीकरण आणले. म्हणजे, काँग्रेसची राज्य पातळीवरील सरकारे व संघटना यांना पंतप्रधानांच्या व केंद्रीय काँग्रेस संघटनेच्या पूर्ण नियंत्रणाखाली आणले. दुसरीकडून काँग्रेसच्या केंद्रीय संघटनेमध्ये इंदिरा गांधींचे नेतृत्व मानतील अशांचाच वर चष्मा ठेवला. तिसरे महत्त्वाचे म्हणजे, केंद्रीय पातळीवरून हस्तक्षेप करून त्यांनी तरुण, महिला, बुद्धीजीवी, मागास जाती, दलित तसेच गरीब या काँग्रेसच्या सत्ता संरचनेत स्थान नसलेल्या समाजघटकांना सामावून घेण्यास सुरुवात केली. चौथे म्हणजे, निदान सुरुवातीच्या काळात, विविध समाजवादी व डावे कार्यक्रम राबवून स्वतःचा एक पाठिंबा वर्ग तयार करण्यास सुरुवात केली. यातील तिसऱ्या व चौथ्या घटकांच्या आधारे श्रीमती गांधींचा इरादा हा एका बाजूला राज्य पातळीवरील काँग्रेसच नेतृत्व कमकुवत करण्याचा व दुसऱ्या बाजूला स्वतःच एककेंद्री नेतृत्व देशातील अशा समाजघटकांपर्यंत नेण्याचा होता. ज्या समाजघटकांचा समावेश सर्वसाधारणपणे राज्य पातळी-वरील काँग्रेस नेतृत्वाच्या राजकारणात होत नव्हता. थोडक्यात समाजवादी व डाव्या धोरणांच्या आधारे स्वतः-साठी एक राजकीय अवकाश तयार करण्याचा श्रीमती गांधींचा हा प्रकल्प होता.

इंदिरा गांधींनी स्वतःचे विश्वासू सहकारीच काँग्रे-सच्या अध्यक्षपदी नेमले जातील असे पाहिले. दुसरे म्हणजे या पदावर अशा नेत्यांना निवडले गेले की ज्यांना लोकांमध्ये फारसे स्थान असणार नाही, ज्यांचा स्वतःचा राजकीय पाठिंबा वर्ग नसेल. तसेच या पदावर एका व्यक्तीला फार काळ ठरू न देण्याचे धोरणही त्यांनी स्वीकारले. त्यामुळेच १९६९ ते १९७६ या सात वर्षांच्या काळात पाच अध्यक्ष काँग्रेसला लाभल्याचे दिसते.

**केंद्रीकरण :**

१९६९ सालच्या काँग्रेसच्या विघटनानंतर इंदिरा गांधींनी आपल्या काँग्रेस (आर) या पक्षातील केंद्रीय संघटनेवर स्वतःचे पक्के निमंत्रण प्रस्थापित केले. काँग्रेस पक्षाच्या घटनेत जरी केंद्रीय पक्षसंघटनेन राज्यातील काँग्रेस-वर नियंत्रण ठेवण्याच्या अनेक तरतुदी असल्या तरी स्वातंत्र्यानंतर पहिल्या दीड दशकात या तरतुदींचा वापर काळजीपूर्वक, आणीबाणीच्या प्रसंगीच केला जात असे. इंदिरा गांधींच्या नेतृत्वाखाली मात्र या तरतुदींचा वापर करून राज्यांतील काँग्रेस संघटनेवर, राज्यांच्या काँग्रेस सरकारातील मुख्यमंत्री – इतर मंत्री निवडण्यावर, राज्यां-मधील विधानसभा–लोकसभा निवडणुकीसाठी पक्षाचे उमेदवार निवडताना केंद्रीय काँग्रेस संघटनेचा सरळ–सरळ व वाढता हस्तक्षेप सुरू झाला. तसेच, सत्तरीच्या दशकातच काँग्रेस संघटना अंतर्गत लोकशाही प्रक्रियेने विविध पातळीवर नेतृत्व निवडण्याची प्रक्रिया थांबवून वरिष्ठ पातळीवरून हे नेतृत्व नेमण्याची प्रक्रिया सुरू झालेली दिसते. याचा परिणाम असा झाला की, तळ-पातळीवर विविध समाजगटांच्या, समूहांच्या असंतोष व खळबळीचे चित्र काँग्रेसच्या वरिष्ठ नेत्यांना सांगणे हे कनिष्ठ पातळीवरील काँग्रेस नेत्यांना जमेनासे झाले कारण हे नेतृत्व हे लोकांमध्ये काम करून पुढे न येता, वरिष्ठ नेत्यांनी नेमल्यामुळे प्रस्थापित झालेले होते. याच्या परिणामी काँग्रेसचे केंद्रीय सरकार विशेषतः, लोकांचा

असंतोष व आंदोलने बळाचा वापर करून दडपू लागले – ज्यामधून जयप्रकाश नारायणांच्या नेतृत्वाखालील जन-आंदोलनाला धार आलेली दिसते (मॅनोर, २००९ : १०१-१०२). अर्थात याचा अर्थ असाही नव्हे की यामुळे काँग्रेसच्या राज्यपातळीवरील गटातटांचे पूर्ण उच्चाटन झाले, प्रबळ हितसंबंधांच प्रतिनिधीत्व करणारे नेतृत्व पूर्ण नेस्तनाबूत झाले. कारण अशा नेतृत्वाच्या पाठिंब्या-शिवाय व सहभागाशिवाय काँग्रेसला निवडणुका जिंकणे शक्यच नव्हते. फक्त ह्या राज्यांमधील प्रबळ नेतृत्वाला प्रभाव कमी व मर्यादित करणेच इंदिरा गांधींच्या केंद्रीय नेतृत्वाला शक्य झाले. या केंद्रीय नेतृत्वाच्या हस्तक्षेपाला राज्यातील अनेक नेत्यांनी विरोधही केलेला दिसतो (कोचा-नेक, २००२ : ८४).

इंदिरा गांधी यांच्या सिंडिकेट नेतृत्वाशी झालेल्या संघर्षाच्यावेळी त्यांना साथ देणारा काँग्रेसचा गट म्हणजे काँग्रेस संसदीय पक्षातील समाजवादी व डाव्या सदस्यांचा गट. १९५० च्या दशकात उत्तरार्धापासून या डाव्या मंड-ळींचा काँग्रेसमध्ये शिरकाव सुरू झाला. यातील काही लोक हे पूर्वी प्रजा समाजवादी पक्षात होते, काही पूर्वी भारतीय कम्युनिस्ट पक्षात, तर काही मंडळी ही काँग्रेस-मध्येच असून काही बाबतीत डावा विचार मानणारी होती. दुसरीकडे सिंडिकेटचे नेतृत्व हे आर्थिक धोरणांच्या बाबतीत उजवीकडे झुकणारे होते. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे या नेत्यांचा राज्या–राज्यात असणारा प्रभाव. आणि राज्यांमधील काँग्रेसचे प्रभावशाली नेतृत्व हे जमीन-सुधारणांसारख्या समाजवादी डाव्या कार्यक्रमाच्या विरोधात होते. इंदिरा गांधींनी, त्यांच्या नेतृत्व स्थापनेच्या सुरुवातीच्या काळात तरी काँग्रेसमधील या डाव्या–उजव्या गटांतील संघर्षात डाव्यांना हाताशी धरून राज्याच्या पातळीवर प्रबळ असणाऱ्या उजव्या केंद्रीय नेतृत्वाला शह दिलेला दिसतो. इंदिरा गांधीनी काँग्रेसच्या विघटनानंतर आपल्या या पक्षांतर्गत डाव्या मंडळींना पक्षाच्या संघटनेत तसेच राष्ट्रीय सरकारमध्ये महत्त्वाचे स्थान दिलेले दिसते. या डाव्या मंडळींच्या प्रभावामुळे व आपला पाठिंबा वर्ग विस्तारण्यासाठी १९६९ ते १९७२ या काळात इंदिरा गांधींच्या सरकारने बँकांच राष्ट्रीयीकरण, संस्थानिकांचे तनखे रद्द करणे, 'गरिबी हटाव'ची घोषणा यासारखे डावीकडे झुकलेले कार्यक्रम स्वीकारलेले दिसतात. अर्थात, वर म्हटल्याप्रमाणे सिंडिकेटच्या नेत्यांमध्येही गट-तट असल्यामुळे, काँग्रेसमध्ये फूट पडल्यानंतरही काही उजवीकडे झुकलेले व राज्यपातळीवरील प्रभावी काँग्रेस नेते इंदिरा गांधींच्या पक्षातच राहिले. विशेषतः १९७२ नंतर, डाव्या काँग्रेस नेत्यांचा प्रभाव डोईजड होतोय हे लक्षात येताच श्रीमती गांधींनी या उजव्या नेत्यांच्या मदतीने डाव्या काँग्रेसी गटाला शह देण्यास सुरुवात केली.

इंदिरा गांधी या पंतप्रधान असतानाच्या काळात त्यांनी केंद्र सरकारमधील दोन महत्त्वाच्या संस्था – राष्ट्रपती व केंद्रीय मंत्रिमंडळ यांनाही आपल्या अंकित ठेवण्याचे धोरण अवलंबले. राष्ट्रपतींना अंकित ठेवल्यामुळे राज्यातील काँग्रेस सरकारांवर नियंत्रण ठेवणे – घटनेच्या कलम ३५६ चा वापर करून विरोधकांची, सरकारे त्यांना शक्य झाले. मंत्रिमंडळावर नियंत्रण ठेवण्यात श्रीमती गांधींनी दोन मार्गांचा वापर केला. एकतर, त्यांनी आपल्या मंत्रिमंडळाची सतत पुनर्रचना चालू ठेवली. यातून एकी-कडून मंत्रिपद मिळालेल्यांना त्याचा वापर करून आपल्या-मागे कार्यकर्त्यांचा व मतदारांचा पाठिंबा वर्ग दीर्घकाळासाठी तयार करता येवू नये याची काळजी त्या घेत होत्या. दुसरीकडून अनेक काँग्रेस कार्यकर्त्यांमध्ये, नेत्यांमध्ये मंत्रिपदाची आशा कायम ठेवून सत्तेच्या हुकमाचे पत्ते – काँग्रेसजनांचा पाठिंबा – स्वतःकडे ठेवू इच्छित होत्या. दुसऱ्या पातळीवरून, मंत्रिमंडळात निर्णय घेण्यासाठी आपला एक, मंत्रिमंत्रातर्गत गट त्यांनी तयार केला होता. हा गट 'किचन कॅबिनेट' या नावाने ओळखला जावू लागला. या किचन कॅबिनेटमधील मंडळी ही इंदिरा गांधींच्या अत्यंत जवळची व विश्वासातील होती. धोरणा-त्मक निर्णय घेण्याचे सर्वाधिकार या किचन कॅबिनेटमध्ये एकवटलेले होते.

**राजकीय परिणाम :**

इंदिरा गांधींनी काँग्रेस पक्ष व भारतीय राजकारणाच्या केलेल्या वरील पुनर्रचनेमुळे काँग्रेस पक्ष राज्यपातळीवर पुरता खिळखिळा झाला. तळपातळीवरून संघटनात्मक काम केल्याने किंवा संस्थात्मक काम केल्यामुळे नेत्यांना व कार्यकर्त्यांना राज्य व केंद्र पातळीवरची अधिकाराची मानाची पदे मिळतील अशी खात्री वाटेनाशी झाली.

याउलट, पक्षाच्या केंद्रीय नेत्यांचा विश्वास संपादन करणे हा पक्षातील उन्नतीचा राजमार्ग बनू लागला. नव्हे, नेत्यांनी काही पक्षीय, कार्यकर्त्यांचा, संस्थाचा राजकीय पाया तयार करणे हे 'डिसक्वालीफिकेशन' होण्याची भीती वाढू लागली. परिणामी प्रत्येक राज्यात काँग्रेसमधील गटा-तटांचे राजकारण, संघर्ष तीव्र झाले. इंदिरा गांधींच्या या व्यक्तीकेंद्रीत राजकारणामुळे भारतीय समाजातील व राजकारणातील संस्थांचा ऱ्हास होण्याची सुरुवात याच काळात झाली. कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता, सर्वांना समान पद्धतीने लागू होणाऱ्या नियमांनी बद्ध अशा संरचना, असा जो विविध संस्थांचा ढाचा भारतीय लोकशाहीने निर्माण करण्याचा प्रकल्प हाती घेतला होता त्याला या काळात मोठा छेद मिळाला. अर्थात, या संस्था कोणत्याही प्रकारचा सत्ता संबंधांच्या बाहेर असण कधीच अपेक्षित नव्हत किंवा शक्यही नव्हत. मात्र त्यांमध्ये चालणारे सत्ता संघर्ष हे एका सर्वमान्य नियमांच्या, बंधनांच्या, मूल्यांच्या चौकटीत लढले जावेत, सोडवले जावेत अशी अपेक्षा होती – जी स्वातंत्र्या-नंतर जवळ जवळ दीड दशके बहुशः पूर्ण होत होती. मात्र श्रीमती गांधींच्या नेतृत्वांतर्गत या सर्वमान्य नियम, बंधने व मूल्यांच्या ऐवजी पक्षश्रेष्ठी, सत्ताधारी यांच्या विश्वासातील, गटातील जे असतील त्यांच्या बाजूने नियम वाकवणे मोडणे, सर्रास सुरू झाले. मग काँग्रेस पक्ष, मंत्रिमंडळ, राष्ट्रपती, मुख्यमंत्री या संस्था एका व्यक्तीची व गटाची बटीक होण्याच्या प्रक्रियेने वेग घेतला. या प्रक्रियेला मग लवकरच एक मान्यता मिळत गेली आणि यथावकाश गावाच्या-जिल्ह्याच्या पातळीपर्यंत मग वशिला, भ्रष्टाचार, नियमांना वाकुल्या दाखवणे हा भाग भारतीयांच्या अंगवळणी पडत गेलेला दिसतो.

**आणीबाणीचा काळ :**

श्रीमती इंदिरा गांधी यांच्या केंद्रीकरणाच्या राज-कारणाविरुद्ध व काँग्रेस जनाच्या राजकारणाविरुद्ध देशा-मध्ये राजकीय चळवळीला सुरुवात झाल्या. गुजरात व बिहारमधील नवनिर्माण चळवळीला लोकांचा पाठिंबा मिळाला या चळवळीचे नेतृत्व श्री. जयप्रकाश नारायण यांच्याकडे होते. १२ जून १९७५ रोजी इंदिरा गांधी गुज-रात विधानसभा निवडणुकीत पराभूत झाल्या. अहलाबाद उच्च न्यायालयाने त्याची लोकसभेवरची निवड रद्द केली व त्यांना सहा वर्षांसाठी निवडणूक लढवण्यास अपात्र ठरविले. त्याविरोधात २६ जून १९७५ रोजी इंदिरा गांधीनी आणीबाणीची घोषणा केली आणि विरोधी पक्षाच्या नेत्यांना तुरुंगात टाकले, वर्तमान पत्रावर बंधने आणली, देशात हुकूमशाही राजवट प्रस्थापित केली ४२ व्या घटना दुरूस्तीने राज्यघटनेचे मूळचे स्वरूप बदलून टाकले. आणीबाणीच्या विरुद्ध जनतेमध्ये मोठ्या प्रमाणात असंतोष निर्माण झाला. १९७७ च्या संसदीय निवडणुकीत विरोधी पक्षाने एकत्र येऊन जनता पक्ष नावाचा पक्ष स्थापन केला. या पक्षाने काँग्रेस पक्षाचा पराभव केला. निवडणु-कीत स्वतः इंदिरा गांधी पराभूत झाल्या व जनता पक्ष सत्तेवर आला. काँग्रेसच्या ऱ्हासालाही खरीखुरी सुरुवात झाली.

निवडणुकी पराभवानंतर इंदिरा गांधी एकाकी पडल्या त्यांच्या विरुद्ध हातामध्ये काँग्रेस संघटना गेली. १ जानेवारी १९७८ रोजी दुसऱ्यांदा काँग्रेस पक्षामध्ये फूट पाडली व स्वतःची काँग्रेस अध्यक्ष म्हणून नेमणूक करून घेतली. इंदिरा गांधींनी काँग्रेस पक्षाने रेड्डी काँग्रेस पक्ष पराभव करीत आंध्र, कर्नाटक व महाराष्ट्र विधान-सभेत चांगली सत्ता संपादित केली. जनतेचा आणि काँग्रेस जनाचा पाठिंबा इंदिरा काँग्रेसला होता. दलित आणि आदिवासी त्याच्या बाजूने उभा राहिल अंतर्गत तणाव जनता पक्षाचे सरकार १९७९ साली कोसळले. डिसेंबर १९७९ साली नव्या निवडणुका झाल्या यावेळी जनता पक्षात फूट पडली होती. काँग्रेसचा निवडणुकीत विजय झाला व इंदिरा गांधी पुन्हा सत्तेवर आल्या.

१९७८ नंतर काँग्रेस पक्षाचे स्वरूप बदलले हा पक्ष पूर्णतः इंदिरा गांधींच्या व्यक्तीमत्त्वावर उभा राहिला. काँग्रेस अध्यक्ष पद आणि पंतप्रधान पद एकाच व्यक्तीकडे देण्यात आले. केंद्रामधून राज्याचे मुख्यमंत्री नेमू जाऊ लागले. स्वतःच्या पाया असणाऱ्या प्रादेशिक पुढाऱ्यांना पक्षात महत्त्व राहिले नाही. १९८० च्या मार्च महिन्यात विधानसभा निवडणुकात ही इंदिरा काँग्रेसचा मोठा विजय झाला आणि मुख्यमंत्री त्यांनी स्वतःच्या पसंतीने राजकीय पुढारी नेमले. उदा. महाराष्ट्रात – ए. आर. अंतुले, कर्नाटकात – गुडूराव, उत्तरप्रदेशमध्ये – व्ही. पी. सिंग

इत्यादी.

**नव्या शक्तीचा उदय :**

१९६० च्या दशकाच्या संपण्याच्या काळात, भारतीय लोकशाहीच्या व आर्थिक विकासाच्या प्रक्रियेतून तीन सत्ताधारी गट अस्तित्वात आले होते. मोठी औद्योगिक घराणी, मोठी जमीनदार-श्रीमंत शेतकरी व सरकारी नोकरशाहीत उच्च पदावर असणारे बुद्धीजीवी हे ते तीन सत्ताधारी गट होत (बर्धन, २००५ : ४०-५३). या तीन गटांत जसे परस्परसहकार्य व साहचर्य होते, तसेच परस्परविरोध आणि हितसंबंधांचा टकरावही होता. यापैकी औद्योगिक व शेती क्षेत्रातील तसेच औद्योगिक व नोकरशाहीतील सत्ताधारी यांच्यातील संघर्ष विशेष तीव्र होता (कित्ता : ५७-५८). यापैकी मोठे शेतकरी व मागास जाती यांच्या हितसंबंधांवर आधारित राजकारण करण्यास चरण सिंग व समाजवादी पक्ष यांनी १९६० च्या दशकाच्या उत्तरार्धापासून सुरुवात केली. यांच्या जोडीला शहरी व्यापाऱ्यांमध्ये पाठिंबा असणारा जनसंघ व काँग्रेसमधील असंतुष्ट गट यांची काँग्रेसविरोधी पक्षांची मोट तयार होवून, त्याला आणिबाणीविरोधी जनसंघर्षाची धार मिळाल्यामुळे १९७७ साली पहिल्यांदा काँग्रेसचा केंद्रात पराभव होवून जनता पक्षाच सरकार सत्तेवर आल. यातील मागास जातींच्या राजकारणाला, १९८० च्या दशकात मंडल आयोगाच्या शिफारसांचा आधार मिळाला, तर जनसंघाच्या हिंदुत्वाला, राममंदिराच्या मोहिमेचा आधार मिळाला. या दोन प्रवाहांमुळे १९९० नंतर काँग्रेस पक्षांच्या भारतीय राजकारणावरील प्रभुत्वाला ओहोटी लागलेली दिसते.

अर्थात, याबरोबरच हेही नमूद करायला हवे की १९७० च्या दशकात, विशेषतः उत्तर भारतात, काँग्रेस-विरोधी राजकारणाचा आधार बनलेल्या मध्यम व श्रीमंत शेतकरी जाती या १९५० च्या दशकात राबलेल्या जमीन सुधारणा व १९६० च्या दशकात राबवलेल्या हरित क्रांती या धोरणांमुळे उदयास आल्या व प्रबळ बनल्या. वरील दोन्ही धोरण ही काँग्रेसच्या राष्ट्रीय पातळीवरील सरकारांनीची राबवलेली होती. मात्र सत्ताधारी गटांमधील, या श्रीमंत शेतकरी जाती व बडे भांडवलदार यांच्यातील अंतर्विरोध तीव्र झाल्याने, चरण सिंग जे १९५० च्या दशकापासूनच शेतकऱ्यांच्या हिताच्या धोरणाचा पुरस्कार करीत होते - यांच्या नेतृत्वाखाली या शेतकरी जातींनी आपल वेगळे राजकारण करण्यास सुरुवात केली.

**काँग्रेसचा ऱ्हास :**

१९८० साली इंदिरा गांधींच्या नेतृत्वाखालील काँग्रेस-पक्षाने परत एकदा लोकसभेत मोठे बहुमत मिळवून सत्ता हाती घेतली. मात्र यानंतर १९८५ पर्यंतच्या काळात हिंदुत्ववादी विचारसरणीचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष पुरस्कार हे काँग्रेसच्या राजकारणाचं वैशिष्ट्य ठरलं. याच महत्त्वाच कारण म्हणजे १९८० नंतर पक्ष म्हणून प्रतिमा असणाऱ्या मात्र 'गांधीवादी समाजवादा'ची झूल पांघरलेल्या भारतीय जनता पक्षाला अनेक राज्यात मिळत असणारे यश. या परिस्थितीत काँग्रेसन सौम्य हिंदुत्ववादी विचारसरणीचा पुरस्कार केल्यास भाजपला मतदान करणारा उच्चजातीय शहरी मध्यमवर्ग-व्यापारीवर्ग काँग्रेसकडे वळवता येईल असा काँग्रेस नेतृत्वाचा आडाखा असावा. एक गोष्ट स्पष्ट आहे - ती म्हणजे काँग्रेसने स्वीकारलेला हा सौम्य हिंदुत्ववाद निवडणुकांच्या राजकारणासाठीची डाव-पेचात्मक भूमिका होती. त्याचा अर्थ काँग्रेसन हिंदुत्ववादाची विचारसरणी उघडपणे - अधिकृतपणे स्वीकारलेली होती असे नव्हे - तर राजकारणातील डावपेचांचा तो एक भाग होता. १९६९ नंतर काही वर्षे जशी या पक्षाने डावी भूमिका - डावपेचांसाठी - स्वीकारली, तसच ही हिंदुत्ववादी भूमिका घेण होत.

१९६० ते १९८५ या कालावधीत काँग्रेस पक्ष हा विशिष्ट सामाजिक-राजकीय-आर्थिक परिस्थितीतून जात असल्यामुळे तसेच इंदिरा गांधींच्या नेतृत्वामुळे या पक्षाची राज्याच्या पातळीवरची पक्षसंघटना पुरती खिळखिळी झाली, पक्षामध्ये दलाल व एजंटांचा सुळसुळाट झाला, संस्थांचा ऱ्हास झाला. परिणामी काँग्रेसन अनेक राज्यात सत्ता गमावली, अनेक राज्यात काँग्रेसतर पक्ष काँग्रेसचा प्रबळ पर्याय म्हणून पुढ आले आणि १९७७ ते १९८० या तीन वर्षांच्या काळात पक्षान राष्ट्रीय पातळीवरची सत्ताही गमावली. अनेक अभ्यासकांच्या मते १९८० ते १९८९ या काळात राष्ट्रीय पातळीवर काँग्रेसच यश म्हणजे खर तर एक मृगजळ होत कारण काँग्रेसची संघटना त्यामुळे परत मजबूत झाली नाही, दलित, मागास

व नंतर उच्च जाती या क्रमाक्रमाने काँग्रेसला सोडून गेल्या आणि काँग्रेस प्रभुत्वाच्या राजकारणाला १९९० पासून पुरती मूठमाती मिळाली.

**संदर्भ :-**

१. वर्धन प्रणब, २००५. द पोलिटिकल इकॉनॉमी ऑफ डेव्हलपमेंट इन इंडिया, नवी दिल्ली : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

२. ऑस्टीन ग्रॅनवील, २००७. वर्किंग ए डेमॉक्रेटिक कॉन्स्टीट्यूशन, नवी दिल्ली : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

३. कोचानेक स्टॅनली, २००२. मिसेस गांधीज पिरॅमिड : द न्यू काँग्रेस, झोमा हसन (संपा.) पार्टीज अँड पार्टी पॉलिटिक्स इन इंडिया, नवी दिल्ली : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

४. मॅनोर जेम्स, २००९. पार्टीज अँड पार्टी सिस्टीम, पार्थ चॅटर्जी (संपा.), स्टेट अँड पॉलिटिक्स इन इंडिया, नवी दिल्ली : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

५. श्रीधरन इ., २००२. द फ्रॅग्मेन्टेशन ऑफ इंडियन पार्टी सिस्टम : १९५२-१९९९, झोमा हसन (संपा.), पार्टीज अँड पार्टी पॉलिटीक्स इन इंडिया, नवी दिल्ली : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

❖❖❖

# काल, आज आणि उद्या

सत्तांतर आणि काँग्रेस

साक्षी

भारतीय राष्ट्रीय काँग्रेस पक्षाला यंदा १२५ वर्षे पुरी होत आहेत. लोकशाही आणि राजकीय पक्ष यांची कोणतीही तोंडओळख हिंदुस्थानाला नव्हती त्याकाळात हा पक्ष जन्माला आला आणि अनेक उत्पातांना तोंड देत व अनेक उत्पात स्वतः निर्माण करीत तो सव्वाशे वर्षे जगला; हिंदुस्थानात निर्माण झालेल्या नाना नवीन विचारांना व चळवळींना स्वतःमध्ये सामावून घेत तो मोठा झाला; स्वतंत्र भारताला राजकीय स्थैर्य देण्याचे महत्कार्य त्याने आपल्या वकुबाप्रमाणे गेली त्रेसष्ट वर्षे पार पडले. या सर्वच गोष्टी अपूर्वाईच्या व अप्रूप वाटावे अशा आहेत. या सगळयासाठी हा पक्ष अभिनंदनाला व शुभेच्छांना पात्र ठरला.

स्वातंत्र्यानंतर काँग्रेस पक्षाची सत्ता देशभर होती व तशी ती पुढे पंचवीस वर्षे एका हाती टिकली. साहजिकच या काळात स्वातंत्र्याच्या चळवळीचे जे इतिहास लिहिले गेले ते काँग्रेसपक्षाच्या चळवळींना केंद्रस्थानी ठेवून लिहिण्यात आले. परिणाम असा झाला की, स्वातंत्र्यपूर्व काळात जे लढे काँग्रेसच्या मुख्यप्रवाहापासून दूर राहून लढविले गेले त्यांना या इतिहासात स्थान राहिले नाही. मुळशी धरणाच्या विरोधातील सेनापती बापटांच्या नेतृत्वाखालील लढा, आसामातील चहाच्या मळयातील मजुरांचे सेनगुप्ता यांनी लढविलेले प्रश्न, मुंबईच्या गिरणी कामगारांचे संप या सर्व चळवळींकडे स्थानिक चळवळी म्हणून पाहिले गेले व स्वातंत्र्य चळवळीच्या इतिहासात त्यांची नोंदही राहिली नाही. तरी सर्वात गोंधळवून टाकणारी हकीकत आहे ती चौरीचौऱ्याच्या हत्याकांडात जे फाशी गेले किंवा ज्योनी दीर्घ कारावास भोगला त्या तरुणांची. चौरीचौऱ्याच्या हत्याकांडातील हे आरोपी असहकार चळवळीत काँग्रेसने जे स्वयंसेवक नोंदवले होते त्यापैकी होते; म्हणजे ते काँग्रेस कार्यकर्तेच होते. परकीय कापड विकणाऱ्या दुकानांसमोर निरोधने करणे हा काँग्रेसच्या लढ्यातील महत्त्वाचा कार्यक्रम होता. हे स्वयंसेवक चौरीचौऱ्यापासच्या गावातील कापडाच्या दुकांनावर निदर्शने करीत असताना त्यांची पोलिसांशी बाचाबाची झाली व तिचे पर्यवसान पोलीस चौकीला आग लावण्यात झाले. त्यात २२ पोलीस जळून गेले. या हिंसाचाराचा उद्वेग येऊन गांधीनी असहकाराची चळवळ थांबविली. त्यांनतर काँग्रेसपक्षाने या स्वयंसेवकांना आपले मानले नाही. ३७ साली त्या वेळच्या युनायटेड प्रॉव्हिन्सेसमध्ये काँग्रेसचे सरकार आले. पण त्या सरकारने या 'हुतात्म्यांची' दखल घेतली नाही किंवा हत्याकांडात सहभागी असल्यामुळे तुरुंगात खितपत पडलेल्या गुन्हेगारांना माफी दिली नाही. पुढे ७२ साली उत्तरप्रदेशातील काँग्रेस सरकारने या 'हुतात्म्यां'च्या वारसांना व गुन्हेगारांना निवृत्तिवेतन चालू केले. या स्वयंसेवकांच्या हातून झालेला हिंसाचार हा संतापाच्या भरात घडून आला होता. तरी त्यांना स्वातंत्र्य-सैनिक म्हणून मान्यता मिळायला इतका काळ जावा लागला. मग ज्यांनी स्वातंत्र्यासाठी हिंसाचाराचे व्रतच घेतले होते अशा क्रांतीकारकांना काँग्रेसने स्वातंत्र्य चळवळींच्या मुख्य प्रवाहापासून बाजूला पडलेल्या, दूर एखाद्या डबक्यातील साचलेल्या व नासलेल्या पाण्याप्रमाणे लेखावे यात आश्चर्य करण्याजोगे काहीच नाही. गोपीनाथ साहा नावाच्या क्रांतिकारकाने अर्नेस्ट डे नावाच्या इंग्रज अधिकाऱ्याचा खून केला. चित्तरंजन दास यांनी अ. भा.काँग्रेस समितीत साहाची देशभक्ती व निःस्वार्थ बलिदान यांचा गौरव करणारा ठराव मांडला. तो ७० विरुद्ध १४८ मतांनी नामंजूर झाला. तथापि, हिंसाचाराचा गौरव करणाऱ्या ठरावाच्या बाजूने ७० मते पडावीत याचे गांधींना इतके वाईट वाटले की त्यांच्या डोळ्यात पाणी आले.

हे सर्व इतक्या विस्ताराने सांगण्याचे कारण की, काँग्रेसच्या नेतृत्वाखाली जी स्वातंत्र्याची चळवळ झाली तिच्याविषयी कोणती पथ्ये काँग्रेसने स्वतःवर घालून होती ते स्पष्ट व्हावे. स्वातंत्र्योत्तर काळातील पहिल्या काही वर्षात स्वातंत्र्यचळवळीचे जे इतिहास लिहिले

गेले त्यात मुख्य भर यावर होत की, काँग्रेसच्या नेतृत्वाखाली व काँग्रेसच्या 'शिस्तीत' राहून जे लढले गेले तो स्वातंत्र्यचळवळीचा मुख्य प्रवाह होता. तीच स्वातंत्र्याची यशस्वी चळवळ होती. या चळवळीमुळे साम्राज्यवाद्यांचा वचक व प्रतिष्ठा ढासळत गेली व अखेर ब्रिटिशांकडून सत्ता काँग्रेसकडे आली.

त्यानंतर अलिकडच्या काळात मुख्यतः १९९० सालापासून, डाव्या विचाराच्या गुहा, बिपनचंद्र यांसारख्या इतिहासकारांनी स्वातंत्र्य चळवळीतील काँग्रेसच्या कामगिरीला महत्त्व देवून शिवाय काँग्रेसच्या बाहेर राहून ज्या चळवळी झाल्या त्यांचीही दखल घेण्यास सुरुवात केली त्यात मुख्यतः स्थानिक चळवळी, स्वराज-पक्षाची कायदेमंडळातील कामगिरी, क्रांतिकारकांनी केलेले कट व हत्या-मुख्यतः भगतसिंग व चंद्रशेखर यांसारख्या क्रांतिकारकांचे प्रयत्न-यांचाही योग्य तो समावेश करण्यात आला. तथापि इतिहासलेखनाची दिशा अशीच राहिली की, काँग्रेसच्या नेतृत्वाखाली चळवळ हीच स्वातंत्र्यप्राप्तीचे निर्णायक कारण ठरली. त्यामुळेच स्वातंत्र्यचळवळीत काँग्रेसची नेमकी भूमिका काय राहिला याचा अंदाज या शतकोत्तर रौप्यमहोत्सवाच्या निमित्ताने घेणे अनाठायी होणार नाही.

(१)

इंग्रजांचे राज्य या देशात टप्प्याटप्प्याने पसरत गेले. १९८३ सालापर्यंत येथील मराठे, रातपूत, शीख, मुस्लिम सत्ताधीश यांच्या राजवटी आणि इंग्रजांचा बंगाल, बिहार, मद्रास या भागात पसरवलेला अंमल यांच्यात कोणताच गुणात्मक फरक नव्हता. परंतु १८१३ साली ईस्ट इंडिया कंपनीच्या सनदेला वीस वर्षांची वाढ देताना ब्रिटिश संसदेने दोन अटी घातल्या एक अशी की, कंपनीने दरवर्षी एक लाख रूपये हिंदी प्रजेच्या शिक्षणासाठी खर्च केले पाहिजेत, व दुसरी ही की, ख्रिस्ती धर्मप्रसारकांना कंपनीने आपल्या अंमलाखालील प्रदेशात धर्मप्रचाराची मुभा दिली पाहिजे. या अटींचा परिणाम असा झाला की, क्रमाक्रमाने येथील लोकात इंग्रजी भाषा, पाश्चात्त्य विचार आणि ख्रिस्ताची शिकवण यांची माहिती वाढत गेली. त्याबरोबरच इंग्रजांनी कायदे केले, न्यायालये स्थापली, शाळा-महाविद्यालये व विद्यापीठे यांच्यामार्फत शिक्षित वर्ग तयार केला. हे सर्व इथे जितक्या सहज लिहिले आहे. तितक्या सुलभतेने घडून आले असे नाही. पण या सर्वांच्या योगाने इंग्रजी राज्यपद्धतीचा ज्यांना लळा लागला आहे, जे मुखर आहेत, ज्यांच्या ठिकाणी इंग्रजी राज्याच्या योगाने काही अधिकार येऊन राहिले आहेत, जे राज्यकर्ते व प्रजा यांच्या संबंधाविषयी विचार करू इच्छितात अशा मनुष्यांचा एक जथा उभा राहिला. अशा जथ्याला राजा राम मोहन रॉय यांनी 'मध्यम वर्ग' हे नाव दिले. राज्यकर्ते व रयत यांच्यात मध्यस्थी करणारा वर्ग मध्यमवर्ग होय.

१८५७ साली, इंग्रज येण्यापूर्वीच्या राजवटींचे अवशेष आणि इंग्रजी सैन्यातील 'बेंगॉल आर्मी' या विभागातील नाराज सैनिक यांनी इंग्रज राजवट उलथून पाडण्यासाठी अटीतटीचा सशस्त्र उठाव केला व इंग्रजांनी तो अतिशय निर्दय व क्रूर उपायांचा अवलंब करून दडपून टाकला. इंग्रजांचा लळा लागलेला वर्ग तेव्हा नुकता रंगपटावर येत होता. नंतरच्या काळात ज्यांना प्रमुखत्व लाभले असे या वर्गातील तरुण इंग्रजांच्या या दडपशाहीने हादरून गेले. पुढे न्यायमूर्ती झलेले माधराव रानडे तेव्हा मुंबईत शिकत होते. एका बंडखोराला तोफेच्या तोंडी दिल्याचा प्रसंग त्यांच्या देखत घडला आणि राज्याला विरोध करावयाचा नाही अशी खूणगाठ बांधली.

या पृष्ठभूमीवर नवीन मध्यमवर्गाने आपले कार्यक्षेत्र असे ठरवून घेतले की, इंग्रजी राज्यकर्त्यांसमोर रयतेच्या अडचणी मांडून त्यांची दाद लावून घ्यायची. याच उद्देशातून या वर्गाने शिक्षणसंस्था काढल्या, वृत्तपत्रे चालू केली. सार्वजनिक संस्था स्थापून त्यांच्यामार्फत सरकारकडे अर्ज विनंत्यांचे खलिते द्यायला सुरुवात केली. याच काळाच्या सुमारास किंवा थोडे पूर्वी खुद्द इंग्लंमधील रयतेने नाना प्रकारच्या चळवळी करून मताधिकाराची कक्षा वाढवून घेतली होती व सत्ताधारी वर्गाकडून अनेक प्रकारच्या सवलती मिळविल्या होत्या. रयतेची गाऱ्हाणी रास्त स्वरूपात आणि भक्कम पाठिंब्याच्या आधारावर सत्ताधीशांपुढे मांडल्यास अनुकूल प्रतिसाद मिळू शकतो, याचे हे हिंदी मध्यमवर्गाच्या देखत घडलेले उदाहरणच होते. इंग्रजी राजवटीने हिंदी समाजाला "शांतता व सुव्यवस्था कायद्याचे राज्य, पाश्चात्त्य शिक्षण, उच्चार








स्वातंत्र्य व उदारमतवादी विचारसरणी अशी वरदाने दिली" याबद्दल हा मध्यमवर्ग इंग्रजांचा ऋणी होता आणि "औद्योगिक विकास, सामाजिक उन्नती व स्वयंशासन" यांची स्वप्ने पाहात होता.(ही उद्धरणे ना. गोखल्यांच्या भाषाणातून घेतली आहेत.)

तथापि, मध्यमवर्गीयांच्या या आकांक्षाना जबरदस्त ठेच कट्टर साम्राज्यवादी व्हाईसरॉय लॉर्ड लिटन (१८७६-१८८०) यांच्या कारकीर्दीत बसली. लिटनने महाराणी व्हिक्टोरिया हिला हिंदुस्थानची सम्राज्ञी म्हणून घोषित केले, अफगाणिस्थानशी लढाई करून तो अनाठायी खर्च हिंदुस्थानच्या माथी मारला व सर्वात वाईट म्हणजे देश-भाषांतील वृतपत्रांकडून जामीन घेण्याचा कायदा केला. इंग्रजांचा लळा लागलेल्या या मध्यमवर्गाला इंग्रजी सत्ताधारी हे अखेर साम्राज्यवादी आहेत याची विदारक जाणीव झाली ती 'इल्बर्ट बिला'च्या विरोधात इंग्रज अधिकाऱ्यांनी जे आकांडतांडव केले त्याच्यामुळे, युरोपीय व्यक्तीवरचा फौजदारी खटला युरोपीयेतर न्यायाधीशापुढे चालू शकेल अशी तरतूद 'इल्बर्ट बिला'त (१८८२) होती. लॉर्ड रिपन हा उदारमतवादी गृहस्थ त्यावेळी व्हाईसरॉय होता. त्याचा या कायद्याला पाठिंबा होता. त्याला देखील नमते घ्यावे लागले व तो होऊ घातलेला कायदा बारगळला. (या चळवळीच्या काळात हिंदी लोकमतही तापले होते आणि 'बिला' बद्दलचा तंटा रिपन व इल्बर्ट यांच्या विरुद्ध नोकरशाही असा न राहता 'हिंदी विरुद्ध गोरे' असे स्वरूप त्याला आले होते. पण याही वेळी सर दिनकरराव राजवाडे यांच्या सारखे काही हिंदी लोक 'युरोपीयांविरुद्धचे खटले चालविण्याची कुवत हिंदी न्यायाधीशात आलेली नाही.' या मताचे होते.) इतके असले तरी रिपनची उदारमतवादी कारकीर्द मध्यमवर्गीयांना फारच भावली. याच काळात स्थानिक स्वराज्य संस्थांची निर्मिती करणारा कायदा झाला. (त्याबरोबर मुसलमानांना स्वतंत्र मतदार-संघही देण्यात आले.) मध्यमवर्गीयांना प्रशासनात सहभागी व्हावयाच्या नव्या वाटा मोकळ्या झाल्या.सर फेरोजशहा मेहता, लो. टिळक, वल्लभभाई पटेल, चित्तरंजन दास,जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस इ.दिग्गज नेत्यांनी प्रशासनाचे पहिले धडे आपापल्या शहरांच्या म्युनिसिपालिट्यातून घेतले.

हे सर्व इतक्या विस्ताराने इथे सांगण्याचे कारण असे की, मध्यमवर्गाची–काँग्रेसच्या स्थापनेपूर्वी इंग्रजी राज्याकडे पाहण्याची जी दृष्टी होती ती स्पष्ट व्हावी. इंग्रजांचा पराभव करून त्यांना नाक मुठीत धरून शरण आणावे आणि सत्ता आपल्याकडे घ्यावी अशा भूमिका या व यांपैकी फारच तुरळक लोकांची असली तर असेल. बहुतेक लोकांची समजूत न्या.रानडे यांच्याप्रमाणेच 'इंग्रजांचे राज्य हे ईश्वरी वरदान आहे' अशीच होती. याही प्रशासका-कडून अन्याय होत होते. ते नैमितिक अन्याय त्या त्या अधिकाऱ्यापुढे मांडून दूर करता येणे शक्य आहे असा विश्वास या सुशिक्षितांना वाटत होता. खुद्द इंग्रजी राज्य हाच एक मोठा अन्याय आहे व ते मुळापासून उखडून टाकले पाहिजे ही कल्पना तर या मध्यमवर्गीयांच्या मनाला शिवलीही नसती.

इंग्रजांच्या बाजूने पाहायचे तर 'आम्ही हिंदी लोकांना प्रशासनात सामिल करून घेणार नाही' अशी भूमिका, कट्टर साम्राज्यवादी इंग्रज वगळता, कोणीही घेतली नाही. इंग्रजांचे मानभावी किंवा प्रामाणिक सांगणे होते की, १८ व्या शतकातील अनागोदींमुळे हिंदी लोक जगाच्या इतिहासातील मुख्य प्रवाहापासून तुटून बाजूला गेले. अज्ञान, अंधश्रद्धा, रानटी धार्मिक समजुती, कालबाह्य रूढी यांच्या खातेऱ्यात रुतून बसले. त्यांना या दलदलीतून सोडवून प्रगतीच्या पथावर आणून सोडण्यासाठी,केवळ ईश्वरदत्त कार्य म्हणून येथे राज्य करीत आहेत. तुम्ही तुमची योग्यता सिद्ध कराल, आमच्या परीक्षेस उतराल तर तुमच्या हाती आम्ही अवश्य कारभार सोपवू. सारांश स्वराज्याची किंवा प्रशासनात अधिकाधिक सहभाग मिळावा ही मागणी करण्याचे कारणच नाही. पात्रता अंगी बाणवा आम्ही स्वराज्य द्यायला उत्सुकच आहोत. (इंग्रजांच्या या साळसूद युक्तिवादाला चपखल उत्तर पुढे अनेक वर्षांनी टिळकांनी दिले की, 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे;' म्हणजे तो मिळण्यासाठी पात्रतेची कसोटी लागूच शकत नाही.) याचा पुरावा म्हणून इंग्रजांनी टप्प्याटप्प्याने अनेक पातळ्यांवरील अधिकारपदे या मध्य-मवर्गीयांसाठी खुली केली. स्थानिक स्वराज्य संस्था काढल्या, प्रांतिक पातळीवरील कायदेमंडळात मर्यादित प्रतिनिधित्व दिले (व पुढे वाढवीत नेले), केंद्रीय सल्लागार

मंडळ (व्हाईसरॉयचे कौन्सिल) यात भारतीयांना नामांकन करून घेतले व आमिष दाखविले की क्रमाक्रमाने आमच्या नोकरशाहीची लोखंडी चौकट अधिकाधिक सैल होत जाईल व केव्हातरी तुम्ही आपला कारभार करू लागाल. खेळाचे नियम आम्ही ठरवले आहेत. ते शक्य तितके रास्त आहेत. तुम्ही खेळ कुशलतेने खेळला पाहिजे.

महत्त्वाचा मुद्दा असा की, इंग्रजांनी घालून दिलेल्या नियमांच्या आधाराने मध्यमवर्गाने व त्यांची संस्था जी काँग्रेस तिने हा खेळ खेळण्याचे ठरविले. यात रस्सीखेच इतक्या पुरतीच राहिली की, मध्यमवर्गाची कारभारातील समावेशाची गती कशी वाढवायची, मध्यमवर्गाच्या अपेक्षे-प्रमाणे गती वाढायला हवी असेल तर त्यांनी आपल्या मागण्यांच्या मागे जोर लावला पाहिजे. त्यासाठी शक्य तर या मध्यमवर्गाच्या बाहेरची जी प्रजा होती तिचे साह्य घेतले पाहिजे. दुर्दैवाची गोष्ट अशी होती की, मध्यमवर्गी-येतर प्रजेविषयी आत्मीयता व त्यातून येणारा विश्वास या मध्यमवर्गीयांना वाटत नव्हता.

या अविश्वासाचा ठोस अनुभव काँग्रेसचे एक संस्था-पक व काँग्रेसचे पहिल्या दोन दशकातले सचिव ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम (१८२९-१९१२) यांना काँग्रेसची स्थापना झाल्यानंतर दोनच वर्षात आला. हिंदी जनतेची आर्थिक दुरवस्था व वाढते दारिद्र्य यांना मूळ कारण इंग्रजांची शोषक राज्यव्यवस्था व अर्थव्यवस्था आहे अशी ह्यूम यांची धारणा होती. त्यावर उपाय म्हणजे येथील प्रशासन येथील प्रजेला उत्तरदायी असले पाहिजे. इंग्लंडमधील सत्ताधारी जमीनदार वर्ग दलित प्रजांचे शोषण करून आपली तुंबडी भरत होता. पण प्रजेने मोठ्या चळवळी केल्या व १८३२ सालापासून पुढे मताधिकाराची कक्षा वाढवत नेली. त्यामुळे राज्यकर्ते प्रजेशी अधिक जबाबदारीने वागू लागले. इंग्लंडमधीलच जे दुसरे उदाहरण ह्यूमसमोर होते ते कॉब्डेन (१८०४-१८६५) याच्या ॲण्टि-कॉन-लॉ-लीगचे. इंग्लंडमधील सत्ताधारी जमीनदार वर्ग देशात अन्नधान्याची खुली आयात करू देण्याच्या विरुद्ध होता. तसे केल्यास शेती उत्पादनांचे भाव कोसळतील व आपल्याला आर्थिक नुकसान होईल असे त्यांचे मत होते. त्यामुळे होई काय की, जेव्हा देशातील पीक काही कारणाने कमी येई तेव्हा धान्याचे भाव अतिशय वाढत व गरिबांवर उपासमारीची पाळी येई. यासाठी कॉब्डेनच्या लीगचे मागणे होते की, कृषीतर उत्पादनांचा परदेशी व्यापार जसा खुला आहे. तसाच तो शेती-उत्पादनांचाही असावा. याबाबतीत इंग्लंडच्या सर-कारला लीगचे म्हणणे मानावे लागले कारण कॉब्डेनची आपल्या लीगच्या चळवळीने सारा देश हादरून गेला होता.

या दाखल्यांवरूनच ह्यूमने असे ठरविले की, हिंदुस्था-नातील गरिबांची स्थिती सुधारावयाची असेल तर गरिबांना बरोबर घेऊन काँग्रेसने सरकार-विरोधी लढा केला पाहिजे व प्रशासन हे रयतेला जबाबदार असावे, असा आग्रह धरला पाहिजे. ह्यूमची ही चाल मध्यमवर्गीयांच्या धोरणापेक्षा वेगळी होती. मध्यमवर्गीय काय म्हणाले असते? विशिष्ट प्रश्न घेऊन —उदा. अन्नधान्याची महागाई व गरिबांची उपासमार — सरकारकडे जावे व काही तड लावून घ्यावी. इथे ह्यूम त्याहून मूलभूत प्रश्नाला हात घालीत होता. त्याने देशभाषातून दोन पत्रके काढून त्यांच्या लाखो प्रती निरनिराळ्या प्रातांत वाटल्या. त्यात त्याने सरकार नाना मार्गाने रयतेला कसे लुबाडले आहे याचे विदारक चित्रण केले होते. आणि जनतेच्या अडीअडचणी व हालअपेष्टा यांच्याकडे सहानुभूतीने पाहणारे सरकार येण्यासाठी प्रशासन प्रजोन्मुख असले पाहिजे असे हृदय-स्पर्शी भाषेत समजावून दिले होते. पण ह्या बाबतीत काँग्रेसने ह्यूमला कोणताही पाठिंबा दिला नाहीच उलट या पत्रकांना काँग्रेस जबाबदार नाही असे सांगून कानावर हात ठेवले आणि पत्रकांची ही चळवळी थांबवावी असा ठराव केला.

पुढे १८९२ साली ह्यूमने एक गोपनीय पत्रक काँग्रेसच्या सभासदांना पाठविले. त्यात त्याने काँग्रेसच्या श्रीमंत व सुखासीन सभासदांना बजावून सांगितले होते की, 'देशातील सध्याचे राज्यकर्ते गरिबांच्या गरजा भागविण्याची फिकीर बाळगीत नाही. प्रजा त्यामुळे भिकेला लागली आहे. जगाच्या इतिहासात कधी घडत नव्हता असा उद्रेक होण्याची शक्यता आहे.' टिळक व हाइंडमन याच्यासारख्या काही जहालांनी ह्यूमच्या ह्या पत्रकाला पाठिंबा दिला. पण काँग्रेसच्या सूत्रधारांनी मात्र जाहीर पत्रक काढून ह्यूमचा निषेध केला. दिनशा वाच्छा यांनी सांगितले की,










'ह्यूम यांची आगलावी भाषा ही राजद्रोहाच्या जवळ जाणारी आहे. आपल्या उन्मत्त पत्रकामुळे ह्यूम हे काँग्रेसचा गळा घोटायला निघाले आहेत.'

ह्यावरून दिसून येईल की, ह्यूम, हाइंडमन यांच्यासारखे काँग्रेसचे ब्रिटिश हितचिंतक हे काँग्रेसला फारच पुढे न्यायला उत्सुक होते. फुटकळ प्रश्नांसाठी सरकारच्या नाकदुऱ्या काढण्यापेक्षा अधिक मूलगामी जी मागणी की, प्रजेला जबाबदार असे सरकार असावे ती जोराने मांडावी असा त्यांचा आग्रह होता. पण अशी मागणी केल्यास व त्यासाठी चळवळ उभारल्यास सरकार काँग्रेसला दडपून टाकील ही भीती फेरोजशहा मेहता, दिनशा वाच्छा, व्योमेशचंद्र बॅनर्जी यांच्यासारख्या काँग्रेसश्रेष्ठींना वाटत होती. त्याचबरोबर हेही खरेच होते की, ह्या नेत्यांच्या सुखासीन वृत्तीला व उच्चभ्रू वागणुकीला अतिशय प्रतिकूल अशी ह्यूमची विचारसरणी होती.

(२)

ब्रिटिश सरकारने खुली केलेली अधिकारपदे स्वीकारायची, त्यांनी घालून दिलेल्या नियमानुसार राजकारणाचा खेळ खेळायचा, काँग्रेस या संघटनेवर भक्कम पकड ठेवायची अशा शिरस्त्याने वागणारी जी सुखासीन, आढ्यतेखोर आणि अहंकारी मंडळी होती त्यांचे मेरूमणी सर फिरोजशहा मेहता हे होते. हे लिहिताना मला, अर्थातच, त्या काळाला अनुसरून त्यांनी दाखविलेली देशभक्ती, त्यांना काँग्रेसविषयी वाटणारी आपुलकी, आपल्या पद्धतीने जनतेची सेवा करण्याची त्यांची प्रामाणिक इच्छा या कशाचाच अवमान करावयाचा नाही.

१८८५ साली काँग्रेसचे पहिले अधिवेशन मुंबईला भरले त्यात मेहतांनी मोठा भाग घेतला. १८८६ व ८७ सालच्या अधिवेशानांना ते हजर नव्हते. १८८८ सालच्या अलाहाबादेच्या अधिवेशनाला ते हजर होते; पण त्यांनी कामकाजात भाग घेतल्याचे दिसत नाही. १८८९ ला मुंबईत भरलेल्या काँग्रेसचे ते स्वागताध्यक्ष होते व ९० सालच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. १८९१ ला नागपुरला अधिवेशन भरले त्याला ते हजर होते; पण नंतर १८९२ पासून १९०० सालापर्यंतच्या एकाही अधिवेशनाला ते हजर नव्हते. १९०१ सालानंतर मात्र काँग्रेसच्या पक्षांतर्गत राजकारणावर त्यांनी घट्ट पकड बसविली. १९०७ साली टिळक व राष्ट्रीय पक्ष यांच्या वाढत्या प्रभावाला शह देण्यासाठी त्यांनी काँग्रेसचे अधिवेशनच नागपुराहून उचलून सुरतेला नेले. सुरत मुंबई प्रांतात येत असल्यामुळे आणि ज्या प्रांतात अधिवेशन असे त्या प्रांताची व्यक्ती त्या अधिवेशनची अध्यक्ष होऊ शकत नाही असा प्रघात असल्याने टिळक अध्यक्ष होण्याची शक्यताच मेहतांनी निपटून टाकली. १९०९ साली, जहालांना काँग्रेसमध्ये येण्याची बंदी केल्याने निष्प्रभ झालेल्या काँग्रेसचे अधिवेशन लाहोरला भरले. मेहतांना त्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून निवडले होते. पण मेहतांनी अध्यक्षपद स्वीकारले नाही.

गोखले, वाच्छा, जिना इत्यादी ठळक पुढाऱ्यांवर मेहतांचे अतिशय वजन होते. मेहता हे फार प्रभावी नेते व नेकीचे देशभक्त आहेत, त्यांच्या ठिकाणी मोठे गुण आहेत, त्यांचे निर्णय कोणीही निःसंशय मान्य केले पाहिजेत अशा आशयाचे भाषण गोखल्यांनी केले होते. इतरांवर व विरोधकांवर छाप पाडण्यासाठीच्या अनेक युक्त्या मेहतांपाशी होत्या. १९०६ सालची कलकत्त्याची काँग्रेस अटीतटीची झाली व मवाळ आणि जहाल यांच्यातील तंटा शिगेला पोचला. त्यावेळी खापर्ड्यांना आपल्या बाजूला ओढण्याच्या हेतूने मेहतांनी अनेक क्लृप्त्या केल्या. खापर्ड्यांना त्यांनी लाडीगोडीच्या भरात मिठीही मारली!

मेहतांचा रुबाब व वचक दांडगा होता याचे वर्णन न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांनी केले आहे – 'मेथा कोणत्याही राष्ट्रीय सभेस क्वचित यावयाचे, आले तर थोडा वेळ बसावयाचे, बसलेच तर केवळ आपला अधिकार चालवायचे व कोणी उलट बोलला तर आपल्या सिंहगर्जनेने किंवा तुच्छतादर्शक मौनाने त्याला भेदरून सोडायचे. फेरोजशहा मेथा यांची बरदास्त करिता करिता कोणत्याही स्वागतमंडळीच्या नाकी नऊ यायचे! एक वेळ तर ऊन खडखडीत पडले असता मेथा साहेबांची झोपमोड होऊ नये म्हणून स्वागत मंडळ व प्रचंड जनसमुदाय स्टेशनवर काही वेळ तिष्ठत उभा राहिला होता. ... मेथांच्या कारकिर्दीत राष्ट्रीय सभा हा श्रीमंती व आढ्यता यांचा मामला होऊन बसला होता.'

मेहता, वाच्छा, गोखले यांना सरकारच्या नियमानुसार राजकारण करण्याची सवय असल्याने व त्यातच देशाचे हित आहे असा त्याचा प्रामाणिक समज असल्याने जहाल-

पक्षाने जेव्हा बहिष्कार, राष्ट्रीयशिक्षण, स्वदेशी व स्वराज्यही चतु:सूत्री पुढे आणून ब्रिटिश राजवटीला मुळापासून हलविण्यासाठी काँग्रेसचा उपयोग करून घेण्याचा प्रयत्न केला. तेव्हा साहजिकच या मवाळांनी जहालपक्षाला अलग पाडले व सरकारने नंतर दडपशाहीच्या बडग्यासाठी जहालपक्षीयांना चोप दिला. टिळकांना मंडालेला पाठविले. राष्ट्रवादी वर्तमानपत्रे बंद पाडली. जॅक्सन खून व राजद्रोही कट या खटल्यात अनेक सालस व्यक्तींना नाहक जबरदस्त शिक्षा दिल्या व केळकरांच्या भाषेत सांगायचे तर या रपाट्याखाली 'महाराष्ट्र निपचित पडला'. पण या बऱ्याच पुढच्या गोष्टी झाल्या.

मेहता व त्यांचे सहकारी यांचा कल इंग्रज सरकारने दिलेल्या सवलतींचा फायदा घ्यायचा आणि सरकारने आखून दिलेल्या मार्गाने चळवळ पुढे न्यायची याकडे होते. खुद्द मेहता एके काळी व एकाच वेळी मुंबई विद्यापीठाच्या सीनेट व सिंडिकेटचे सभासद, मुंबई महानगरपालिकेचे सभासद, मुंबई प्रांताच्या गव्हर्नरच्या कौन्सिलचे सभासद आणि गव्हर्नर-जनरलच्या, म्हणजेच व्हॉईसरॉयच्या, कौन्सिलचे सभासद इतकी पदे उपभोगीत होते. खेरीज मुंबई उच्च न्यायालयात त्यांची वकिली जोरात होती व भरपूर पैसे ते मिळवीत होते. साहजिकच या घालमेलीत त्यांची ओढाताण व्हावयाची व गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलच्या बैठकीलाही ते हजर राहू शकत नसत. त्यामुळे त्यांनी त्या कौन्सिलचा राजीनामा दिला व गव्हर्नर जनरलला गळ घालून गोखल्यांना आपल्या जागी नेमविले.

(३)

मी पूर्वीच म्हटल्याप्रमाणे इंग्रजांपैकी कट्टर साम्राज्यवादी सोडले तर बहुतेक सर्व मुत्सद्दी मनोमन हे धरून चालले होते की, हिंदुस्थानातील आपले साम्राज्य काही कायमचे टिकणारे नाही. त्यांची राजनीती अशी होती की, दरवेळी काही सवलती किंवा अधिकार येथील प्रजेला देऊ करावयाचे. असे झाले की, येथील नेत्यात दोन गट पडत. एकास वाटे की, मिळालेल्या सुधारणा सध्या पदरात पाडून घेऊ; दुसरा पक्ष म्हणे की, मिळालेल्या सुधारणात स्वराज्याचा गाभाच दिसत नसल्याने त्यांच्यावर बहिष्कार टाकावा. दोन तटांच्या या वादावादीत इंग्रजांना आणखी ५-१० वर्षे दडपशाहीचा उपयोग न करता राज्य चालविता येईल. इंग्रज राज्यकर्त्यांना दडपशाही करता येत नसे, असे नाही; पण ज्या राजकीय तत्त्वांवर ब्रिटिश समाजाचा विश्वास होता त्या तत्त्वांशी दडपशाहीचे नाते जुळत नव्हते. १९२९ सालचा 'पूर्ण स्वराज्या'चा काँग्रेसचा ठराव, नंतरची कायदेभंग चळवळ व त्यानंतर दडपशाहीने चळवळीचा कणा मोडल्यानंतर काँग्रेसने केलेला १९३५ च्या सुधारणांचा स्वीकार. या घटनाक्रमातून इंग्रजांची येथील राजनीती व काँग्रेसकडून त्या राजनीतीला मिळणारे प्रत्युत्तर यातील द्वंद्व (डायालेक्टीक्स) उद्‌बोधकपणे उलगडत जाते.

असहकार चळवळीचा शेवट होऊन गांधींना तुरुंगवासाची शिक्षा झाली. प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते १९३४ साली मुदत पुरी होण्यापूर्वीच व त्यावर्षी बेळगावला काँग्रेस अधिवेशन भरले त्याचे अध्यक्ष झाले. गांधी तुरुंगात असताना कायदेमंडळ प्रवेशाचा आग्रह धरणारा पण काँग्रेस अंतर्गत असणारा 'स्वराज्यपक्ष' व कायदेमंडळावरील बहिष्काराचा आग्रह धरणारा 'नाफेर पक्ष' यांच्यात तीव्र मतभेद झाले होते. गांधींनी काँग्रेसची सर्व सूत्रे स्वराज्यपक्षाकडे दिली व नाफेरवाद्यांनी ग्रामीण भागात जाऊन विधायक कार्य करावे, असा आदेश दिला. त्यानंतर मोतीलाल नेहरूंच्या पुढाकाराने काँग्रेसने हिंदुस्थानाची नवी घटना कशी असावी याचा विचार करण्यासाठी सर्वपक्षीय बैठक बोलावली. या बैठकीत अनेक मुद्यांवर मतभेद झाले. त्यात मुसलमानांच्या स्वतंत्र मतदारसंघाचा मुद्दा सर्वाधिक कटकटीचा होता. यावेळी घटनेचा मसुदा करण्यासाठी एक समिती नेमण्यात आली. तीवर अनेक महत्त्वाचे नेते होते; पण अखेर त्या समितीचे कामकाज मोतीलाल नेहरू, जवाहरलाल नेहरू व तेजबहादूर सप्रू अशा तिघांनीच पुरे केले. जवाहरलाल नेहरू समितीचे अधिकृत सभासद नव्हते, पण ते त्यावेळी काँग्रेसचे सचिव असल्याने समितीचे काम पाहत असत.

हिंदुस्थानाने स्वायत्त वसाहतींचा दर्जा (डोमिनियन स्टेटस) मिळवावा व तो मिळाल्यास हिंदुस्थानाची घटना कशी असावी, याचा विचार नेहरू समितीने केला होता. 'स्वायत्त वसाहती'ची संकल्पना अशी होती की, अशा देशाला अंतर्गत व परराष्ट्र धोरणाच्या बाबतीत पूर्ण

स्वतंत्रपणे निर्णय घेता येतील. तथापि हे देश ब्रिटिश साम्राज्याचाच भाग असतील, ब्रिटनच्या राजाशी एकनिष्ठ राहतील, आणि ब्रिटिश राष्ट्रकुलाचे सदस्य असतील. १९२८ साली कॅनडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका, न्यूझीलंड व आयर्लंड हे पाच देश 'स्वायत्त वसाहतीं'चा दर्जा उपभोगीत होते व 'लीग ऑफ नेशन्स'चे सदस्य होते. नेहरू समितीचा अहवाल काँग्रेसने स्वीकारणे याचा अर्थ असा होता की, काँग्रेसने 'स्वायत्त वसाहती'चा दर्जा मिळावा, असे आपले उद्दिष्ट ठेवणे.

सत्तावीस सालापासून काँग्रेसमध्ये या प्रश्नावर दुफळी माजली होती. जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस इत्यादी त्या काळचे तरुण व जहाल पुढारी यांचा आग्रह असा होता की, काँग्रेसने पूर्ण स्वातंत्र्याची मागणी करावी व त्यासाठी लढा पुकारावा. १९२८ साली कलकत्त्याला काँग्रेसचे अधिवेशन भरणार होते आणि मोतीलाल नेहरू त्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले होते. या अधिवेशनासाठी या दोन फळ्यांमधील वादविवाद चिघळणार असे स्पष्ट दिसत होते. काँग्रेस स्वराज्यपक्षाच्या हवाली केल्यापासून गांधी काँग्रेसच्या कारभारात लक्ष घालीत नसत. पण मोतीलाल यांनी कलकत्त्याच्या अधिवेशनासाठी गांधींना आग्रहपूर्वक बोलावून घेतले.

आपण पाहिलेच आहे की, 'स्वायत्त वसाहत' आणि 'संपूर्ण स्वतंत्र देश' यांच्यातील फरक व्यावहारिक दृष्टीने विचार केला तर अगदीच नगण्य होता पण तात्त्विक दृष्टीने तो फरक खूपच महत्त्वाचा होता. गांधी, मोतीलाल, मालवीय व इतर अनेक प्रौढ नेते सध्या आपण 'स्वायत्त वसाहती'ची मागणी करावी अशा मताचे होते व अ. भा. काँग्रेस समितीत त्यांचे बहुमत होते. तथापि, जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस हे झळकते तारे होते आणि तरुणांच्या गळ्यातील ताईत होते. त्यांना नाराज करून चालणारे नव्हते. तेव्हा काँग्रेसमधील फाटाफूट टाळण्यासाठी गांधींनी अशी तडजोड काढली की, या (२८ सालच्या कलकत्ता येथील) अधिवेशनात आपण 'स्वायत्त वसाहतीं'ची मागणी करू. वर्षभरात सरकारने ती मान्य केली तर ठीकच; नाहीतर पुढच्या अधिवेशनात (१९२९ साली) आपण 'पूर्ण स्वराज्या'ची मागणी करू. ही तडजोड मान्य झाली.

यावेळी काँग्रेसच्या अंतर्गत कारभारात फार अनागोंदी माजली होती. पूर्ण स्वराज्याच्या मागणीवर लढा द्यायचा झाल्यास काँग्रेसमध्ये शिस्त, एकजूट व उत्साह दिसून यायला हवा होता. जवाहरलाल हे काँग्रेसचे सचिव होते. त्यांना गांधींनी सुचविले की, काँग्रेसचे हिशेब तपासा, पक्षाच्या बांधणीचा आढावा घ्या. जवाहरलाल यांनी तपास घेतला असता असे दिसून आले की, स्थिती अगदीच केविलवाणी होती.

अनेक काँग्रेस कार्यकर्त्यांनी व प्रदेश समित्यांनी अ. भा. काँग्रेस समितीकडून पैशाची उचल घेतली होती व ते परत आले नव्हते. (उदा. बंगाल काँग्रेस समितीकडून एक लाख एकूण चाळीस हजार रूपये इतके येणे होते.) अ. भा. कॉ. समिती व प्रादेशिक समित्या यांचे खर्च मुंबई काँग्रेस समितीने मुंबईतील उद्योगपतींकडून पैसे गोळा करून या समित्यांना उसने दिलेल्या पैशतून चालले होते. हिशेबाची व खर्चाची ही स्थिती होती तर अनेक प्रदेश काँ. समित्यांचे नियमानुसार गठनही आलेले नव्हते. जिल्हा काँग्रेस समित्या बऱ्याच ठिकाणी स्थापन झालेल्या नव्हत्या. कित्येक काँग्रेस समित्यातील दादा लोकांनी आपल्याला पाठिंबा देणारी मंडळी बळेच काँग्रेस सभासद म्हणून दाखल करून घेतली होती.

अशा बाजार-बुणग्यांच्या सहाय्याने 'पूर्ण स्वराज्याची' अटीतटीची लढाई लढणे अशक्य होते. इंग्रज सरकार काही तरी तोडगा काढून लढा लढण्याची पाळी येऊ देणार नाही अशा आशेवर अनेक नेते लढ्याची भाषा करीत होते. अखेर व्हॉईसरॉय लॉर्ड आयर्विनने ३१ ऑक्टोबर १९२९ ला बंद दार थोडे किलकिले केले. त्याने ब्रिटिश सरकारची (तेव्हा मजूर पक्ष सत्तेवर होता.) मंजुरी घेऊन एक निवेदन प्रसिद्ध केले. त्यात म्हटले होते, "हिंदुस्थानची घटनात्मक प्रगती 'स्वायत्त वसाहती'चा दर्जा मिळण्याच्या दिशेने होत आहे. हिंदुस्थानाच्या घटनेत कोणत्या सुधारणा करावयाच्या याचा विचार करण्यासाठी संबंधित पक्षांची व हितसंबंधीतांची एक गोलमेज परिषद भरवावी असा (इंग्लंडच्या) सरकारचा विचार आहे." इथे हे लक्षात घेणे जरुर आहे की, 'स्वायत्त वसाहती'चा दर्जा देण्यासाठी ही परिषद भरणार आहे असा संकेत या जाहीरनाम्यात नाही. त्यानंतर अलाहाबाद हायकोर्टाचे

मुख्य न्यायाधीश मिअर्स यांच्यामार्फत आयर्विनने मोतीलाल व नेमस्त पक्षाचे सप्रू यांच्याशी 'गोलमेज परिषदे'त भाग घेण्याविषयी अनधिकृत बोलणी करण्यास सुरुवात केली.

या निवेदनानंतर काँग्रेसच्या पुढाऱ्यात नाना विचार-प्रवाह सुरू झाले. जिना, जयकर, सेटलवाड या मुंबईच्या पुढाऱ्यांनी एक पत्रक काढून आयर्विनच्या निवेदनाचे स्वागत केले. काँग्रेस अध्यक्ष मोतीलाल व सचिव जवाहर-लाल नेहरू यांनी काँग्रेसच्या सभासदांना समज दिली की त्यांनी कोणतीही जाहीर प्रतिक्रिया देऊ नये. गांधींनी नेमस्त पक्षाचे नेते श्रीनिवास शास्त्री यांना सांगितले की, 'स्वायत्त वसाहतीं'चा दर्जा ताबडतोब देण्यास ज्या अडचणी असतील त्यांच्या अनुषंगाने काही शर्ती आम्ही मान्य करू. पण त्या अमुक एका दिवशी आपोआप संपुष्टात येतील अशी तरतूद करण्यात यावी; तसेच त्या शर्ती गोलमेज परिषदेतील सर्वांची संमती मिळवून घालण्यात याव्यात. खेरीज सर्व राजबंद्यांची बिनशर्त सुटका करावी. या पूर्व अटी मान्य होतील तर आम्ही गोलमेज परिषदेत भाग घेऊ. तथापि, या बोलण्यातील मध्यस्थ जे श्रीनिवास शास्त्री व सप्रू त्यांना 'पूर्व अटी' ही कल्पना स्वतःला मान्य नव्हतीच पण आयर्विनला ती मान्य होणार नाही, अशी त्यांची खात्री होती.

दिनांक १–२ नोव्हेंबर १९२९ रोजी दिल्लीला काँग्रेस व काँग्रेसेतर पुढाऱ्यांची एक बैठक बसली. बैठकीला विठ्ठलभाई पटेल, गांधी, जवाहरलाल, सप्रू, मोतीलाल, सुभाषचंद्र, मुंजे असे बरेच पुढारी हजर होते. बैठकीच्या शेवटी एक जाहीरनामा प्रसिद्ध करण्यात आला. त्यात म्हटले होते, "राजेसाहेबांच्या सरकारने हिंदुस्थानाच्या परिस्थितीला सोयींनी ठरेल अशा तऱ्हेची 'स्वायत्त वसाहती' ची घटना तयार करण्यासाठी प्रयत्न करावयाचे ठरविले आहे. आम्ही त्या प्रयत्नास मदत करू शकू अशी आम्हाला आशा वाटते. तथापि सरकारच्या या प्रयत्नांच्या प्रामाणिक-पणाविषयी विश्वास वाटावा अशी कृती सरकारने केल्या पाहिजेत. राजकीय बंद्यांची सुटका व प्रशासनातील औदार्य यात त्या अपेक्षित कृती होत." जाहीरनाम्यात अशी आशा व्यक्त केली होती की, होऊ घातलेल्या (गोलमेज) परिषदेत हिंदुस्थानाला 'स्वायत्त वसाहती'चा दर्जा केव्हा द्यायचा याची चर्चा होणार नाही; तर असा दर्जा देणारी घटना कशी असावी याचा विचार होईल." या जाहीर-नाम्यात सुभाषचंद्र बोस यांनी सही केलीच नाही; पण जवाहरलालही सही करण्यास तयार नव्हते. अखेर गांधींनी आपले वजन खर्च करून त्यांना सही करावयास लावले.

दिल्लीहून कलकत्त्याला गेल्यावर सुभाषचंद्र बोस यांनी काँग्रेस कार्यकरिणीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला व जवाहरलाल यांना आपण सही केल्याचा पश्चाताप होऊ लागला. दिल्लीचा जाहीरनामा त्यांना अगदीच असमा-धानकारक वाटू लागला. गांधी व आपण स्वतः यांच्यात आयर्विनच्या निवेदनाबद्दल मूलभूत मतभेद आहेत, असे त्यांनी गांधींना कळविले. जवाहरलाल यांनी असेही सुचविले की होऊ घातलेल्या लाहोर काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून आपल्याला मुक्त करावे व गांधींनीच अध्यक्ष व्हावे. त्या सर्व रुसव्या–फुगव्यांमुळे गांधी व मोतीलाल यांना कळून चुकले की, आपण जर आयर्विनच्या निवेदनाचा आधार घेऊन गोलमेज परिषदेत सामिल होण्याचे ठरविले तर काँग्रेसमध्ये १९०७ साली सुरत काँग्रेसमध्ये झाली तशी फाटाफूट होण्याची शक्यता आहे.

त्यानंतर १६–१८ नोव्हेंबर १९२९ ला अलाहाबादेला काँग्रेस कार्यकरिणीची बैठक झाली. तिला सुभाषचंद्र, सप्रू, जमनादास, मेहतचा व इतर अनेक जण खास निमंत्रित म्हणून हजर होते. खुद्द काँग्रेस कार्यकारिणीचे नऊ सदस्यच उपस्थित होते. तिथे असा ठराव झाला की, "दिल्लीच्या जाहीरनाम्यावर काँग्रेसच्या काही सदस्यांनी सह्या केल्या आहेत. त्याला ही कार्यकारिणी काँग्रेसचे येते अधिवेशन भरेपर्यंत मान्यता देत आहे." त्यानंतर २३ डिसेंबर १९२९ रोजी गांधी, मोतीलाल, सप्रू, विठ्ठलभाई पटेल व जिना यांनी आयर्विनशी भेट झाली. त्या भेटीत असे दिसून आले की, गांधी व मोतीलाल यांची सरकारशी सहकार्य करावयाची तयारी नव्हती. आयर्विननेही हिंदी जनतेत असलेल्या–विशेषतः हिंदू–मुसलमानांमधील मत-भेदांचा विषय काढला. तेव्हा गांधी म्हणाले की, "आमच्यात (म्हणजे हिंदी लोकांत) मतभेद आहेतच. म्हणूनच तर आमचे (म्हणजे काँग्रेसचे) सांगणे आहे की, व्हाईसरॉय व ब्रिटिश सरकार आमच्या (म्हणजे काँग्रेसच्या) मागण्यांमागे ठामपणे उभे असतील. (म्हणजे स्वायत्त वसाहतीचा दर्जा देण्याची त्यांची पक्की तयारी असेल.)

तरच गोलमेज परिषदेत जाण्यात अर्थ आहे." इथे बोलणी संपली.

काँग्रेस स्वायत्त वसाहतींच्या मागणीवरून स्वातंत्र्याच्या मागणीपर्यंत पुढे सरकली व लढ्याचा धाक दाखवू लागली. तेव्हा इंग्रज सरकारने स्वायत्त वसाहतीचा दर्जा पुढे कधीतरी देऊ व सध्या त्या दृष्टीने सुयोग्य घटना तयार करण्यासाठी गोलमेज परिषद भरवू असे आमिष दाखवले. त्यात त्यांचा तात्कालिक हेतू काँग्रेसमध्ये फाटाफूट घडवून आणून जहालांना निराळे पाडण्याचा होता. तो त्यांचा उद्देश सफल होण्यापर्यंत पोचलाही होता; पण गांधीनी ती फाटाफूट टाळली व लाहोर काँग्रेसमध्ये 'पूर्ण स्वराज्या'चा ठराव मंजूर करून घेतला. तथापि, या पलीकडे इंग्रजांचा अधिक दीर्घकालीन डाव होता, तो हा की, हिंदुस्थानाचे स्वातंत्र्य लांबणीवर टाकण्यासाठी आणखी खेळ्या खेळता येतील असा पट करायचा व आपल्या नियमानुसार खेळायला काँग्रेसला भाग पाडायचे. तो त्यांचा उद्देश सफल झालाच. ते कसे ते थोडक्यात पाहू.

(४)

यानंतर गांधींनी कायदेभंगाची चळवळ सुरू केली. पूर्वीची सहकाराची चळवळ चौरीचौऱ्याच्या हिंसक घटनेनंतर गांधींनी तहकूब केली होती. आताही अनेकांना भीती वाटत होती की, असेच काही विघ्ने येऊन गांधी चळवळ थांबवतील पण गांधींनी ही भीती दूर केली. ते म्हणाले, "आपल्या भोवती (सरकारने चालविलेल्या) हिंसाचाराचा फास कायमचाच पडलेला आहे. तेव्हा स्वातंत्र्यासाठी झगडताना हिंसक घटनांना घाबरून चालणार नाही."

कायदेभंगाची चळवळ ही स्वातंत्र्याच्या चळवळीतील एक गौरवशाली पर्व आहे. हे कोण नाकारू शकेल? १२ मार्च १९३० ला सुरू झालेलीर दांडी यात्रा, गांधींच्या अटकेनंतर धारासना येथे सरोजिनी नायडू यांच्या नेतृत्वाखाली दोन हजार सत्याग्रहींनी हू कीं चू न करता सोसलेला क्रूर लाठीहल्ला, नव्वद हजार कार्यकर्त्यांना घडलेला दीर्घकालीन तुरुंगवास, प्रभात फेऱ्या व त्यातील 'नहीं रखनी, नहीं रखनी, सरकार जालिम नहीं रखनी' किंवा 'म्हणून आलो प्रभात फेरीत राष्ट्रीय गाणी गाण्याला' यासारखी जुन्या लोकांच्या ओठावर आजही रेंगाळणारी गाणी, विनोबा व साने गुरुजी यांनी लिहिलेले विद्वत्तापूर्वक उद्बोधक ग्रंथ आणि तुरुंगातून समाजवादी दीक्षा घेऊन बाहेर पडलेले तरुण यांच्यामुळे त्या दोन वर्षांना सुवर्णाची झळाळी आली आहे.

'पूर्ण स्वराज्या'च्या ठरावाच्या निमित्ताने जरी ही चळवळ सुरू झाली, तरी दांडी यात्रा सुरू करण्यापूर्वी गांधीनी सरकारपुढे ज्या ११ मागण्या ठेवल्या होत्या त्यात 'पूर्ण स्वराज्या'चा कोठेही उल्लेख नव्हता. पत्रकारांनी या संबंधात गांधींना डिवचले तेव्हा गांधींनी सांगितले की, "या मागण्या मान्य झाल्या तर सामान्य जनतेच्या दृष्टीने स्वराज्य मिळाल्यासारखेच आहे." हे उत्तर चलाखीचे व समर्पक आहेच; पण त्यातून सरकारला अशी सूचना दिली जाते की, 'आम्ही तुमच्या नियमानुसार खेळ खेळण्यास तयार आहोत.' कारण, 'पूर्ण स्वराज्य' या प्रश्नावर सरकार वाटाघाटी करण्यास तयार झालेच नसते. मात्र विशिष्ट गाऱ्हाण्यांवर चर्चा होऊ शकते. या विशिष्ट मागण्या करण्यात दुसराही उद्देश असणे शक्य आहे. मी सुरुवातीलाच म्हटले होते की, काँग्रेस ही मध्यमवर्गाची संघटना होती व स्वातंत्र्याच्या निर्णायक लढ्यासाठी मध्यमवर्गीयेतरांचा पाठिंबा मिळविणे जरूर होते. या ११ मागण्या मध्यमवर्गीयेतर जनतेला काँग्रेसकडे ओढण्याऱ्या होत्या. लाहोर काँग्रेसच्या अधिवेश-नात जवाहरलाल यांनी समाजवादी विचारसरणीवर जो भर दिला होता तो त्या काळी अनेकांना अनाठायी वाटला. पण समाजवादाचे हे निरूपण काँग्रेस कार्यकर्त्यांना आपला मध्यमवर्गीय कोश भेदून बाहेर पडायला उत्तेजन देणारे होते. हेही मर्यादित स्वरूपात का होईना मान्य केले पाहिजे.

दरम्यान पहिली गोलमेज परिषद लंडन येथे भरली. त्यात १६ जण ब्रिटनमधील तीन पक्षांचे प्रतिनिधित्व करीत होते. हिंदी लोकांचे प्रतिनिधी म्हणून ५७ जणांना बोलावले होते. आणखी सोळा जण संस्थानिकांचे प्रतिनिधी म्हणून आले होते. या बैठकीत केंद्रस्थानीय प्रशासनाची व प्रांतिक प्रशासनाची रचना कशी असावी याचा विचार झाला. केंद्रीय कायदेमंडळात ब्रिटिश हिंदुस्थानचे निवडलेले प्रतिनिधी व संस्थानिकाचे प्रतिनिधी असावेत. या कायदे-

मंडळाला अनेक बाबतीत कायदे करण्योच स्वातंत्र्य असले तरी संरक्षण, परराष्ट्र संबंध व अर्थव्यवहार या क्षेत्रातील अनेक भाग गव्हर्नर जनरलच्या अखत्यारीत राहतील असे ठरविण्यात आले. प्रांतिक स्तरावर पूर्ण स्वायत्तता द्यावी, असे तत्त्वतः मान्य करण्यात आले. पण अनेक बाबी प्रांतिक गव्हर्नराच्या अखत्यारीत राखीव विषय म्हणून ठेवण्यात आल्या. वादाचा मुख्य विषय जो 'अल्प-संख्याकांना संरक्षण' त्याचा विचार मात्र पुढच्या परिषदेपर्यंत पुढे ढकलण्यात आला. आता ब्रिटिश सरकारने निश्चय केला की, शक्य तितके उपाय करून पुढच्या परिषदेला काँग्रेसच्या प्रतिनिधींना परिषदेत हजर ठेवायचेच.

या दिशेने पहिले पाऊल म्हणून २५ जानेवारी १९३१ रोजी आर्यविनने गांधी व काँग्रेसनेते यांना कैदेतून सोडले. नंतर सप्रू, जयकर व इतर अनेक वजनदार मध्यस्थांचा उपयोग करून त्याने गांधींना आपली भेट घेण्यास राजी केले. ही भेट २५ फेब्रुवारी १९३१ रोजी झाली व तीत सुरू झालेल्या वाटाघाटी ५ मार्च १९३१ पर्यंत चालून त्या दिवशी 'गांधी आर्यविन करारा'वर सह्या झाल्या.

आपण पाहिले की, कायदेभंगाची चळवळ सुरू झाली तरी, 'पूर्ण स्वराज्य' मिळविण्यासाठी. पण गांधींनी दांडीयात्रा सुरू करताना ज्या ११ मागण्या केल्या त्यात 'पूर्ण स्वराज्या'चा उल्लेखही नव्हता. गांधी आर्यविनशी बोलणी करण्यास गेले तेव्हा आपल्या ६ मागण्या तरी मान्य झाल्याच पाहिजेत असा आग्रह त्यांनी धरला होता. या सहा मागण्यांचा पूर्वीचा ११ मागण्यांशी फारसा काहीच संबंध नव्हता, व या ६ मागण्याही गांधींना पूर्णपणे पदरात पाडून घेता आल्या नाहीत. उदा. मिठाविषयीचे कायदे व कर यात काहीच बदल करण्याचे आर्यविनने मान्य केले नाही. मात्र समुद्र किनाऱ्याच्या खेड्यातील लोकांना स्वत:पुरते (व्यापारासाठी नव्हे) मीठ तयार करायला परवानगी देण्यात आली. या उलट काँग्रेसने नवीन गोलमेज परिषदेत भाग घेण्याला संमती दर्शविली आणि सत्याग्रहाची चळवळ मागे घेतली. याचाच अर्थ असा की, ब्रिटिशांनी घालून दिलेल्या नियमानुसार खेळ खेळण्याचे काँग्रेसने मान्य केले.

तथापि, 'गांधी-आर्यविन करार' ही काँग्रेस नेत्यांना व कार्यकर्त्यांना फार मोठी उपलब्धी वाटली व त्यांच्यामध्ये उत्साहाची एकच लाट आली. याउलट ब्रिटिश अधिकाऱ्यांना वाटू लागले की, हा करार म्हणजे नोकरशाहीने पत्करलेली शरणागती आहे. त्यामुळे करारानंतरच्या काही महिन्यात देशभर स्थानिक चळवळी, सुटून आलेल्या सत्याग्रहींचे स्वागत सभा-संमेलने व सरकार-विरोधी पत्रके आणि लेख यांचा एकच कल्लोळ झाला. (या काळात शं. द. जावडेकर यांनी 'चित्रमय जगता'त लिहिलेले लेख जिज्ञासूंनी अवश्य वाचावेत.) एप्रिल १९३१ मध्ये आर्यविन परत गेला व कट्टर साम्राज्यवादी लॉर्ड विलिंग्डन गव्हर्नर-जनरल म्हणून आला. त्याने पुनः दडपशाहीचा कहर करून गवताच्या अंकुरावर खडक ठेवावा त्याप्रमाणे या चळवळी व उत्साह दडपून टाकला.

आपण असे मानतो की १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळीमुळे देशातील तळागाळाच्या लोकांपर्यंत स्वातंत्र्याची कल्पना पोचली, मोठी जागृती निर्माण झाली आणि साम्राज्यवादी नोकरशाहीच्या प्रतिष्ठेला धक्का पोचला. तथापि ही समजूत पूर्णतः खरी नाही. इंग्रज सरकारने मार्च १९३२ मध्ये आपल्या अगदी खालच्या पायरीवरील नोकरवर्गाकडून-म्हणजे मामलेदार, जिल्हा मॅजिस्ट्रेट इ. - ब्रिटिश राज्याविषयी लोकमत काय आहे याची प्रामाणिक व अधिकृत माहिती मागविली. सर्व सरकारी अधिकाऱ्यांचे असे ठाम मत होते की, त्यांच्या भागातील बहुतेक प्रतिष्ठित माणसे आणि समाजातील अनेक विभाग यांचा कायदेभंग व काँग्रेस यांना विरोध होता. लष्करी व सरकारी नोकऱ्यातून निवृत्त झालेल्या व्यक्ती, जामीनदार, मुसलमान यांचा चळवळ-विरोधक म्हणून या अहवालातून अनेकदा उल्लेख आला आहे. मथुरा जिल्ह्याच्या मॅजिस्ट्रटने कळविले की, "खेडूत लोकांना शांतता व सुव्यवस्था याच्यापलीकडे काही नको असते, त्यामुळे आमच्या जिल्ह्यातून चळवळीला पाठिंबा मिळण्याचा प्रश्नच येत नाही. ... इथल्या लोकांना 'स्वराज्य' म्हणजे काय याची काहीच कल्पना नाही." मैनपुरी जिल्ह्याच्या मुस्लिम जिल्हा मॅजिस्ट्रेटचे हेच मत होते. "आमच्या भागात सरकारने रयत व जमीनदार यांना खंड व शेतसारा यात सवलती दिल्यामुळे लोक खुश आहेत. महाराष्ट्रातील कुलाबा जिल्ह्यातील अहवाल हेच

सांगतो. "रयत, मुख्यतः शेतकरी समाज, सरकारशी एकनिष्ठ आहे." या अहवालांवरून हे स्पष्ट दिसते की, इंग्रजी नोकरशाहीची, कायदेभंगाची वावटळ संपल्या-नंतर, अशी पक्की खात्री होती की, ही चळवळ म्हणजे पांढरपेश्यांच्या उद्योग होता; आम जनता मात्र-मुख्यतः ग्रामीण भागातील शेतकरी समाज-सरकारी कारभाराबद्दल समाधानी होती.

(५)

आता पर्यंतच्या विवेचनावरून हे स्पष्ट होते की, इंग्रज राज्यकर्ते-त्यांच्यातले कट्टर साम्राज्यवादी देखील हे समजून होते की, येथील सत्ता आपल्याला केव्हा ना केव्हा सोडावी लागणार. त्याचबरोबर या राज्यकर्त्यांची ही इच्छा साहजिकच होती की हा सत्तांतराचा दिवस शक्य तितक्या लांबणीवर टाकण्याचा प्रयत्न करावयाचा. सत्तेचा गाभा असणारे अर्थ, गृह व संरक्षण हे प्रशासन-विभाग हिंदी जनतेच्या प्रतिनिधींच्या हाती शक्य तो जाऊ द्यावयाचे नाहीत.

काँग्रेसच्या चळवळी जोवर सरकारने आखून दिलेल्या मार्गाने चालतील तोवर त्या सहन करावयाच्या किंवा त्यांना शक्य तितका कमी विरोध करावयाचा म्हणजे उदाहरणार्थ, असहकार चळवळीत काँग्रेसने विधि-मंडळे, न्यायालये व सरकारी छत्राखाली चालणांऱ्या शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घातला. त्याला सरकारने विरोध केला नाही. परंतु कायदेभंगाची चळवळ सरकारने दारुण दडपशाही करून रगडून टाकली. मात्र अशी दडपशाही करण्याची सरकारची तयारी असली, तरी दडपशाहीचा आधार घेऊन राज्य चालवावे अशी येथील नोकरशाहीची मनस्थिती नव्हती. कारण, ब्रिटिश लोकशाही व राज्यकार-भाराची तत्त्वे यांच्या चौकटीत दीर्घकालीन दडपशाही बसत नव्हती. म्हणून कायदेभंगाची चळवळ क्षीण होताच सरकारने गांधीसमोर गोलमेज परिषदेचा पर्याय ठेवला.

१९४२ च्या चळवळीबद्दलही असेच विवेचन करता येईल. बेचाळीसचा लढा हे स्वातंत्र्याच्या चळवळीतील एक उज्ज्वल पर्व मानले जाते. गांधींच्या व काँग्रेसच्या नेतृत्वाखाली हा लढा चालला नाही, कारण लढा सुरू होण्याच्या आधीच गांधी व काँग्रेस कार्यकारिणी यांना अटक करण्यात आली. नंतर लढ्याला संकीर्ण स्वरूप आले. बिहार, बंगाल, महाराष्ट्रातील सातारा जिल्हा इथे स्थानिक सशस्त्र उठाव झाले. काँग्रेस समाजवादी पक्षाच्या जयप्रकाश नारायण, लोहिया, अरुणा असफ अली व अच्युतराव पटवर्धन आणि साने गुरूजी यांसारख्या नेत्यांनी भूमिगत राहून व परस्परांशी संपर्क साधून लढ्याला नेटके रूप देण्याचा प्रयत्न केला. शिवाय असंख्य तरुण कार्यकर्त्यांनी आपापल्या परीने घातपाताची कृत्ये केली, पत्रके काढली, आकाशवाणीची गुप्त केंद्रे चालविली. या सर्वांचा त्याग, धडाडी, जोखीम पत्करायाची जिद्द या गोष्टी आजही आपल्याला गौरवशाली वाटतात यात शंका नाही. पण हा लढा संपला तेव्हाही, लढ्यात भाग घेऊन जे जनतेकडून कौतुक व कीर्ती यांचे मानकरी झाले होते अशा कार्यकर्त्यांना स्वातंत्र्यासाठी आणखी एक निर्णायक लढा द्यायला हवा, असेच वाटत होते. (इथे एक गोष्ट नमूद करण अस्थानी होणार नाही. ती ही की, सुटून आल्यानंतर काँग्रेस कार्यकारिणीची डिसेंबर १९४५ मध्ये जी सभा झाली तीत एका ठरावान्वये चळ-वळीत सार्वजनिक मालमत्तेची होळी करणे, टेलीग्राफच्या तारा जोडणे व आगगाड्या रूळांवरून घसरविणे ह्या गोष्टी काँग्रेसच्या धोरणाला धरून नाहीत, असे स्पष्टपणे सांगितले होते.) असो.

यानंतर ब्रिटिशांनी त्यांच्या नेहमीच्या धोरणाला अनु-सरून काँग्रेसपुढे नवीन डाव मांडला. तो म्हणजे त्रिमंत्री योजनेचा होय. इंग्लंडहून आलेल्या त्रिमंत्री-मंडळाने काँग्रेस, मुस्लिम लीग व इतर पक्ष यांच्याशी वाटाघाटी केल्या. हिंदुस्थानाची नवी घटना करायची तर तिची तत्त्वे कोणती असावीत-मुख्यतः मुसलमानांसारख्या अल्पसंख्यांकांना स्वयंनिर्णयाचा हक्क असावा का व तो कसा अंमलात आणावा-याची चर्चा केली. त्रिमंत्री मंडळाच्या योजनेचे थोडक्यात स्वरूप असे होते. (१) इंग्रजी अंमलाखालील हिंदुस्थान व संस्थाने यांचे मिळून संघराज्य बनेल व त्याच्याकडे परराष्ट्र संबंध, संरक्षण व दळणवळण हे तीन विषय राहतील. यांचा कारभार पाहण्यासाठी वित्त संग्रहीत करण्याचे अधिकारही संघराज्याकडे असतील. (२) ब्रिटिश अंमलाखालील प्रांतांचे तीन गट असतील. पहिल्या गटात हिंदुबहुल प्रांत; दुसऱ्या गटात पंजाब, सिंध व वायव्य सरहद्द प्रांत आणि तिसऱ्या गटात बंगाल

व आसाम (३) संघाकडे नसलेले विषय व अधिकार प्रांतांकडे असतील. प्रांत आपले अधिकार स्वेच्छेने गटाकडेही संपवतील. प्रांत स्वतःच्या व गटांच्या घटना तयार करतील.

या त्रिमंत्री योजनेचा विचार करण्यासाठी जुलै १९४६ मध्ये अखिल भारतीय काँग्रेस समितीची बैठक भरली. काँग्रेसचे त्यावेळचे अध्यक्ष मौलाना आझाद यांनी असा ठराव मांडला की, काँग्रेसने ही योजना स्वीकारावी. यावेळी काँग्रेसमध्ये काँग्रेस समाजवादी पक्षाला बरेच वजन होते. ४२ व्या चळवळीचे तेजोवलय ज्यांच्याभोवती होते अशा जयप्रकाश नारायण, अच्युतराव पटवर्धन, अरूणा असफअली व डॉ. लोहिया या समाजवादी नेत्यांनी त्रिमंत्री यांजनेचे वाभाडे काढून ही योजना फेटाळून लावावी व अटळ असलेला आणखी एक मारण-मरणाचा लढा लढवला पाहिजे, असा आग्रह धरला.

या नेत्यांनी फुगविलेल्या फुग्याला गांधींनी हलकेच टाचणी लावली. ते म्हणाले, "मी अनेक सत्याग्रही लढे लढविले आहेत. तशीच वेळ आली आणि मी एकाकी असलो, तरी लढा सुरू करायला कमी करणार नाही. पूर्वी ही गोष्ट मी केली आहे पण ही वेळ सत्याग्रहाची वा उपवासाची नाही. माझ्या मते आजच्या घटकेला (त्रिमंत्री मंडळाच्या योजनेतील पहिल्या भागात सांगितलेली) संघराज्याची घटना समिती हे सविनय कायदेभंगाचा पर्याय आहे." नंतर ठराव मंजूर झाला. इथून पुढे झालेल्या राजकारणात काँग्रेसने त्रिमंत्री मंडळाने घालून दिलेली योजना पूर्णपणे राबविली. काँग्रेस घटना परिषदेत सामिल झाली. तिने 'मंत्रीमंडळ'ही बनविले. पुढे व्हाईसरॉय वेव्हेलच्या आग्रहाखातर मुस्लिम लीगलाही 'मंत्रिमंडळा'त स्थान दिले. पण ही योजना न टिकण्याला दोन कारणे झाली. पहिले म्हणजे लीगच्या प्रेरणेने सुरू झालेले हिंदुविरोधी दंगे व त्यांना तितक्याच हिंसक पद्धतीने हिंदूंनी दिलेले उत्तर. या दंग्यांच्या वेळी ब्रिटिशांना कळून चुकले की सैन्याचा उपयोग हे दंगे दडपून टाकण्यासाठी करण्यात धोका आहे. कारण, हिंदु सैनिक हिंदु दंगेखोरांवर हत्यार उचलणार नाहीत; व मुस्लिम सैनिक मुसलमानांना आवरणार नाहीत. सैन्याची शिस्त तकलुपी झाली आहे. दुसरे कारण असे की, दुसऱ्या महायुद्धाने इंग्लंडची इतकी दरिद्री अवस्था झाली होती की, इंग्लंडहून हिंदुस्थानात गोरे सैन्य आणवून राज्य चालवणे परवडणारे नव्हते. (हिंदुस्थानाला स्वातंत्र्य देताना इंग्लंडचा पंतप्रधान ॲटली याने हीच दोन कारणे सांगितली होती.) त्यामुळे इंग्लंडने येथील राज्य तडका-फडकी सोडून देण्याचे ठरविले. इंग्रजांच्या या निर्णयाचा काँग्रेसच्या चळवळीशी फारच दूरान्वयाने संबंध लावता येईल.

काँग्रेसने साधले होते ते हे की, इंग्रजाकडून जिच्याकडे सत्ता जाऊ शकेल अशी संघटना तिने बांधली होती. त्यामुळे सत्ता कोणाकडे सोपवावी हा प्रश्न बहुसंख्य हिंदु असणाऱ्या विभागापुरता सुटला होता. पण काँग्रेसचे हे अपयश होते की, मुस्लिम बहुतांक असणाऱ्या प्रदेशात काँग्रेस पोचू शकली नव्हती त्यामुळे मुस्लिम लीगसारखी एक उपटसुंभ संघटना इंग्रजांनी त्या भागात उभी केली व तिच्या पदरात सत्ता टाकली. आज भारत व पाकिस्तान यांच्या स्थितीत जो फरक आहे त्याचे मूळ काँग्रेसचा अस्सलपणा व मुस्लिम लीगची उपरेगिरी यांच्यातील तफावतीत आहे.

**संदर्भग्रंथ :–**

१. Biman Behari Muzumdar & Bhakt Prasad Muzumdar : Congress and Congressmen in Pre - Gandhian Era (1885-1917) Firma K. L. Mukhopadhyay, Calcutta. (1967)
२. D. A. Low (Ed.) The Indian National Congress. Oxford University Press, London (1988)
३. न. चिं. केळकर, समग्र केळकर वाङ्मय-असहकारिता खंड (प्रकाशक व प्रकाशन वर्ष दिलेले नाही.)
४. Edward Thompson and G. T. Garratt, Rise and Fulfilment of British Rule in India. Central Book Depot, Allahabad. (1973)
५. D. P. Mishra, India's March to Freedom Har Anand Publications Pvt. Ltd., New Delhi (2000)






६. D. A. Low, Britain and Indian Nationalism, Cambridge University Press, Cambridge (1997)

७. Judith M. Brown, Gandhi, Prisoner of Hope, Oxford University Press, Bombay (1992)

८. मधु लिमये, आत्मकथा, अक्षर प्रकाशन, मुंबई (२०००).



---

# लेखकांचा परिचय

❋ **प्रा. डॉ. अशोक चौसाळकर**

राजकीय उपपत्ती व राजकीय चळवळी या दोन्हीचेही मर्मज्ञ अभ्यासक.

***पत्ता :–*** प्राध्यापक व विभाग-प्रमुख, विद्यानगरी, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४१६ ००४.

दूरध्वनी : २६३९४८५

❋ **प्रा. विठ्ठल दहिफळे**

प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग वरिष्ठ, पीपल्स कॉलेज, नांदेड. साधना मासिक व दै. लोकमत यामध्ये लेख प्रकाशित.

***पत्ता :*** पीपल्स कॉलेज, नांदेड (मराठवाडा).

❋ **प्रा. शैलेंद्र खरात**

प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग, डी. डी. शिंदे सरकार महाविद्यालय, कोल्हापूर.

***पत्ता :*** डी. डी. शिंदे सरकार महाविद्यालय, भवानी मंडप, कोल्हापूर.

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारताकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स अॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका